श्री कालिका प्रसन्न.

# महाराणा राजसिंह.

ही ऐतिहासिक कादंबरी

रा. ब. बाबू बंकिमचंद्र चट्टोपाध्याय यांच्या मूळ वंग

भाषेतील ग्रंथावरून

आत्माराम आप्पाजी ऊर्फ बाबा पांडे.

यांनीं लिहिली

ती

दत्तात्रय गोविंद सडेकर यांनीं

आपल्या धनंजय छापखान्यांत छापिली.



किंमत बारा आणे.

# प्रस्तावना.

हल्लींच्या सुधारलेल्या काळांत आपल्या मराठी भाषेंत दरवर्षी जनमनरंजनार्थ पुष्कळशीं नाटकें व कादंबऱ्या प्रसिद्ध होत असतात. पण ह्या प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकसमूहांत आपल्या देशास अनुलक्षून लिहिलेलीं ऐतिहासिक पुस्तकें फार थोडीं. मराठी भाषेंतील ही उणीव भरून काढावयास नांवाजलेल्या कित्येक ग्रंथकारांनीं आपापल्या लेखण्यास थोडा इशारा केला तर हें काम होण्यासारखें असून, तें लांबणीवर पडत चाललें आहे. हें पाहून सध्यां कादंबऱ्या व नाटकें ह्यांविषयीं प्रसिद्ध असलेल्या बंग भाषेंतील कांहीं **ऐतिहासिक कथासुंदरींना** महाराष्ट्र वेश देऊन जनमनरंजनार्थ कधीं कधीं दृग्गोचर करविण्याचा विचार केला आहे.

प्रकृत पुस्तक बंग भाषेंतील प्रसिद्ध कादंबरीकार रा० ब० बाबू बंकीमचंद्र चट्टोपाध्याय ह्यांच्या " राजसिंह " नामक ऐतिहासिक कादंबरीचें भाषान्तर आहे.

मूळ पुस्तकांतील रस कदाचित् लिहिण्यास नूतनच तासलेल्या या माझ्या लेखणीस महाराष्ट्र भाषेंत बरोबर उतरलाही नसेल, पण त्यास माझा निरुपाय आहे. सुज्ञांनीं या माझ्या अल्पकृतीचा स्वीकार केला, असें माझ्या कानीं आल्यास बंग भाषेंतील अशाचांही कांहीं ऐतिहासिक कादंबरीकुसुमें रसिकचरणीं अर्पण करण्याचा माझा दृढ संकल्प आहे. तो ईश्वर पूर्ण करो, अशी त्यास प्रार्थना करून हा लहानसा प्रस्तावना लेख पुरा करितों.

| | |
|---|---|
| मु० लखनौ, | आपला नम्र, |
| ता० २८।१२।९९ | आत्माराम आप्पाजी पांडे. |

---



# महाराणा राजसिंह.

## भाग पहिला.

### अंतःपूर.

राज्यस्थान ज्याला राजपुतानाही ह्मणतात, त्या राजपुतान्याच्या पहाडीप्रदेशांत रूपनगर नांवाचें एक लहानसें राज्य होतें. राज्य लहान असो किंवा मोठें असो; त्यांत राजा असतोच; त्याप्रमाणें रूपनगरांतही एक राजा होता. राज्य जसें लहान होतें, तसें राजाचें नांव नसून तें विक्रमसिंह असें होतें. ह्या विक्रमसिंहाच्या विक्रमाचा (पराक्रमाचा) परिचय करून देण्याचें हें स्थळ नाहीं. सध्यां आह्माला त्याच्या अंतःपुरांत जावयाचें आहे, ह्मणून तिकडे वळूं. जसें राज्य छोटें तसेंच नगर, पण राजवाडा मोठा भव्य आणि सुंदर असून त्यांतही अंतःपूर तर प्रतिस्वर्गच! ह्या अशा स्वर्गतुल्य अंतःपुरांत ह्यावेळीं एक मोठ गालीचा आंथरला असून, त्यावर वस्त्रालंकारांनीं सुसं-

ज्जित दहा बारा स्त्रिया बसल्या आहेत; कोणी विडे करीत आहेत, कोणी हारगजरे गुंफित आहेत, व कोणी वेणीफणी करीत आहेत. बहुतेक साऱ्या तरूणच आहेत व ह्यावेळीं त्यांचा विनोद चालला असून, त्या हांसत आहेत! कारण काय ह्मणाल, तर एक ह्मातारी चित्रें विकणारी त्यांच्या मंडळींत आली आहे; तिच्याजवळ लहान लहान व पण सुंदर चित्रें बरींच आहेत. त्यांचा खप झाला तर राजवाड्यांत बराच होईल, ह्या इच्छेनें ती आपलीं चित्रें घेऊन त्या स्त्रीमंडळांत आली आणि आपलें गांठोडें सोडून त्यांतून एक एक चित्र काढून ती त्यांना दाखवूं लागली. तें पाहून ह्या आमच्या राजवाड्यांतील त्या रंगेल तरुणींना त्या चित्रांतील व्यक्तींच्या परिचयाची अभिलाषा उत्पन्न झाली, हेंच हंशाचें कारण. ह्मातारी चित्र काढून दाखवीत आहे, तोंच एक तरुणी ह्मणाली, ही कोणाचीग तसबीर?

ह्मातारी—शहाजहान बादशहाची.

तरुणी—चल, मेले वेडे! जणूं कांहीं त्याला आह्मी ओळखतच नाहीं! अग ही तसबीर तर आमच्या बाबाची!!

इतक्यांत एक तरुणी ह्मणाली–अां अशी खोटें कां बोललेस! तुझ्या नवऱ्याची तसबीर असून बापाचेंग कशाला नांव मध्यें? एकदां नाहीं का त्यांच्या त्या ऐटबाज कल्लयामध्यें विंचू गेलेला पाहून आली तो झाडगांनें काढला! बिचारा आतारा त्या दिवशीं मोठ्या जिवावर वांचला!!

एवढें बोलली मात्र, तों एकदम साऱ्या दिवाणखान्याभर एकच हंसें पिकलें! ह्मातारीनें दुसरें चित्र काढून हें **जहांगिर** बादशहाचें आहे, असें ह्मणून प्रत्येकीस तें दाखवूं लागली. तें पाहून **रसिका** नांवाची एक तरुणी ह्मणाली––पण याची किंमत? ह्मातारीनें बरीच भारी किंमत सांगितल्यावर रसिका पुनः ह्मणाली, अग ही किंमत तर ह्या तसबिरीची झाली. पण ज्याची ही तसबीर आहे, त्याला **नूरजहान** बेगमेनें किती रुपयांस खरेदी केलें होतें

**ह्मातारी**–( थट्टेनें, ) फुकट!!

**रसिका**–अस्सलाची ही स्थिती, मग नकलेलाग कोण विचारितो? घरून एखादें गाठोडें आणून मजजवळ ठेव, ह्मणजे मग तूं ह्मणशील तीच किंमत तुला मिळेल! **रसिकेच्या** ह्या विनोदानें पुनः हा हा ही ही सुरू

झाली! ह्यामुळें म्हातारीस अंमळ वाईट वाटलें व त्रासल्यासारखें करून ती म्हणाली कीं, घेणें देणें तर दूरच राहिलें पण थट्टा मात्र भरपूर! चला, राजकन्या येतपावेतों मी मुळींच तसबीरी दाखवीत नाहीं. त्यावर तेथें बसलेल्या पांच सात तरुणी एकदम म्हणाल्या, आम्हीच तर राजकन्या आहोंत म्हातारे! म्हातारी चोहोंकडे वेड्यासारखी पाहूं लागली व जिकडे तिकडे एकच हंशा पिकला! असो, थोड्याच वेळांत हंशा बंद झाला व गडबड नाहींशी झाली. पावसाची सर निघून गेल्यावर जसा विद्युत्प्रकाश रहावा त्याप्रमाणें सर्वांच्या ओठावर हास्याची छटा मात्र दिसूं लागली. हा सर्वांच्या वृत्तीचा एकदम झालेला पालट पाहून म्हातारीस मोठें आश्चर्य वाटलें, व याचें कारण काय असावें हें शोधावें म्हणून ती मागें वळून पहाते तों, जणूं लक्ष्मीची मूर्तीच मागें अचल उभी असलेली तिला दिसली! म्हातारीचे डोळे त्या सर्वांगसुंदर पाषाणवत् मूर्तीकडेच लागून ती म्हणाली किती तरी ही सुंदर मूर्ती आहे! म्हातारपणामुळें म्हातारीची दृष्टि जरा कमी झाली होती, नाहींतर तिला समजलें असतें

कीं, पांढऱ्या पाषाणाचा रंग हा असा कसा व ह्यावर हीं गुलाबी छटा कशी, व हे आरक्त ओंठ कसे? पाषाण तर पाषाणच, पण हा रंग फुलांत देखील असण्याची मारामार! असो; कांहीं वेळ गेल्यावर म्हातारी पहाते तों, त्या मूर्तीचें मुख सस्मित दिसूं लागलें! ही मूर्ती हंसते कशी, कोण जाणे; ही मूर्तीच आहे कीं एखादी चंचल दृष्टीची तरुणी आहे? असें म्हणून म्हातारी मोठ्या संशयांत पडली. कांहींच निश्चय करवेना. तेव्हां निरुपाय होऊन तिनें कित्येक तरुणीला प्रश्न केला कीं "हें काय आहे?"

म्हातारीच्या ह्या प्रश्नास त्यांच्याकडून हंसण्यापलीकडे कांहीं जबाब मिळाला नाहीं. आपल्या प्रश्नाचें उत्तर तर मिळालें नाहीं, परंतु त्या उलट्या खो खो करून हंसतात, हें पाहून म्हातारीस फार वाईट वाटलें. व तिचे डोळे पाण्यानें भरून आले असें पाहतांच त्या सर्वांगसुंदर मूर्तीनें "म्हातारे, कां बरें रडत्येस?" असें मधुर स्वरानें विचारलें, तेव्हां म्हातारीचा साराभ्रम उडून जाऊन ही पाषाणाची मूर्ति नसून कोणी तरुणी—मग ती राजकन्या असो किंवा राणी असो—

असें तिला वाटून तिनें तिला साष्टांग नमस्कार केला. ह्या नागीचा नमस्कार राजकुलाकरितां नसून केवळ सौंदर्याला तिचा नमस्कार होता. आणि खरेंच; सौंदर्याला लीन न होणारे ह्या सृष्टींत कितीजण सांपडतील? पण नाहीं, ह्या सृष्टींत केवळ सौंदर्यालाही लीन होणारे सर्वच लोक नाहींत, स्वार्थाला लीन होऊन नाक घासणारेही आहेत. आमच्या ह्यातारीचा प्रकार मात्र असा नव्हता. आम्हांला वाटतें कीं, त्या सर्व शक्तिमान परमेश्वराच्या सौंदर्याची छाया जाणून ह्यातारीनें त्या सुंदरीला नमस्कार केला असावा.

---

## भाग दुसरा.

### तसबिरांची आवडनिवड.

साक्षात् लक्ष्मी समजून जिला आमच्या ह्यातारीनें नमस्कार केला, ती जगन्मोहिनी सुंदरी, रूपनगराच्या राजाची कन्या चंचलकुमारी होती, आणि ह्या समोंवतालच्या स्त्रिया तिच्या दासी व सख्या होत्या. चंचलकुमारी ह्या ठिकाणीं आली तेव्हां एकसारखें

हांसणें चालले होतें. तें पाहून तीही अमळ सस्मित भावानें उगीच तमाशा पहात उभी राहिली होती. ह्यावेळीं अमळ अवसर पाहून ती ह्यातारीला म्हणाली "बाई, तूं कोण आहेस"? म्हातारी आतां उत्तर देणार तोंच तिच्या सर्व सख्या ह्मणाल्या--" ही तसबिरा विकणारी आहे."

चंचलकुमारी—मग तुम्हाला हंसायाला काय झालं होतं?

राजकन्येच्या ह्या प्रश्नामुळें बहुतेक स्त्रिया अमळ चरकल्या, पण जिनें झाडणीचें नांव घेऊन एका तरुणीची फजिती उडविली होती, ती पुढें होऊन म्हणाली; आम्ही हंसलों ह्यांत आमचा दोष मुळींच नाहीं. ही म्हातारी प्राचीन बादशहांच्या तसबिरा म्हणून भलतींच चित्रें आम्हाला दाखवीत होती! जणू कांहीं आमच्या राजवाड्यांत असलेल्या **अकबर, जहांगिर** इत्यादिकांच्या तसबिरी आम्हीं पाहिल्याच नाहींत!

**ह्मातारी**–पाहिल्या नाहींत—असं माझं ह्मणणं नाहीं. एक तसबीर जवळ असली तर दुसरी घेऊंनये असा जर नियम असता, तर आह्मां गरीबाचं पोट चाललंच नसतं.

हें ऐकून राजकन्या म्हणाली—बरं तर, तसबिरी दाखीव आम्हांला. म्हातारीनें मान डोलवून एक एक तसबीर दाखविण्यास आरंभ केला. अकबर, जहांगिर, शहाजहान, नूरजहान, नूरमहाल, इत्यादिकांच्या तसबिरी दाखविल्या, पण चंचलकुमारीनें तिरस्कार दृष्टीनें त्या सर्व परत करून, म्हटलें कीं, ह्या मुसलमानांच्या तसबीरी तर आमच्या राजवाड्यांत पुष्कळ आहेत. एखाद्या हिंदु राजाची तसबीर असल्यास दाखीव. म्हातारीनें " बरं आहे बाईसाहेब " म्हणून मानसिंह, बिरबल, जयसिंह, इत्यादिकांच्या तसबिरी दाखविल्या. पण राजकन्येनें त्यांच्याकडेही तिरस्कार दृष्टीनें पाहून म्हटलें " छे, छे, ह्या नकोत, हे कांहीं हिंदु नव्हत. हे मुसलमानाचे दास आहेत मेले!! "

म्हातारी—हंसून म्हणाली कोण कोणाचा दास आहे हें मला काय बरं माहीत? जो माल मजजवळ आहे, तो दाखविला; पसंत असल्यास घ्या नाहींतर राहिला. असें म्हणून पुन्हां कांहीं तसबिरी दाखवूं लागली व त्यांतून राजकन्येनें प्रतापसिंह, अमरसिंह, राणा कर्ण, यशवंतसिंह इत्यादिकांच्या तसबिरी विकत घेतल्या. म्हाता-

रीनें एक तसबीर लपवून ठेविली होती तिकडे राजकन्येचें लक्ष जाऊन ती म्हातारीला म्हणाली, म्हातारे; ही लपवून ठेविलेली तसबीर कोणाचीग? म्हातारी कांहीं बोलली नाहीं. हें पाहून राजकन्येनें पुनः तोच प्रश्न केला. तेव्हां म्हातारी घाबरून हात जोडून उभी राहिली व म्हणाली· अपराध माफ करावा. चुकून इतर तसबिरांबरोबर ही आली आहे.

राजकन्या—अग पण अशी घाबरतेस कां? कोणाची तसबीर आहे ती तुला दाखवायाला झालं काय?

म्हातारी—( घाबरून ) बाईसाहेब, पाहून काय कराल? ही आपल्या बाबासाहेबांच्या वैऱ्याची[1] तसबीर आहे.

राजकन्या—त्याचं नांव काय?

म्हातारी—राजसिंह.

राजकन्या हंसून म्हणाली, हा वेडे, वीर पुरुष कोठें स्त्रियांचे वैरी असतात! आण इकडे ती तसबीर. असें म्हणून म्हातारीजवळून चंचलकुमारीनें ती तसबीर घेतली,

---

१ राजकुमारीचा बाप **विक्रमसिंह** मुसलमानाच्या पक्षाचा होता व **राजसिंह** तर मुसलमानांचा वैरी; अर्थात् हा त्याचा शत्रू.

ती पाहतांच राजकन्येचें मन मोहीत होऊन तिची दृष्टि तसबिरीकडे खिळली. मुख प्रफुल्लित झालें व डोळे आनंदानें भरून आले. ही तिची दशा पाहून सख्यांपैकीं एकीनें ती तसबीर पाहण्याची इच्छा दर्शविली, तें पाहून तसबीर तिचे हातीं देऊन चंचलकुमारी ह्मणाली सखे, किती तरीग हें सौंदर्य!! ह्यांच्या ह्या मुखकमलाकडे पहातांच यांच्या अंगांतील शौर्याची सहज अटकळ होते. हे शब्द तिच्या तोंडांतून निघतात, तोंच चोहोंकडे ती तसबीर सर्वांच्या हातांतून इकडे तिकडे फिरूं लागली व प्रत्येकीच्या मुखांतून त्या तसबिरीची स्तुति होऊं लागली.

ह्यातारीनें हा असा आलेला योगायोग पाहून त्या तसबिरीची किंमत दुप्पट तिप्पट सांगितली. आणि लोभावश होऊन ह्मणाली—बाईसाहेब, आपणांस शूर लोकांच्याच जर तसबिरी पाहिजे असतील तर मी दाखवितें. एवढी आणखी घ्या. असें ह्मणून एक तसबीर राजकन्येला दाखविली व ह्मणाली कीं, साऱ्या पृथ्वीवर ह्यांच्यासारखा वीर पुरुष दुसरा नाहीं.

**राजकन्या**—कोणाची बरें ही तसबीर ह्यातारे?

म्हातारी—औरंगजेब बादशाहाची, बाईसाहेब अगदीं घेण्यासारखी तसबीर आहे.

राजकन्येनें संमती दर्शवून एका दासीला त्या घेतलेल्या तसबिरींची किंमत आणून द्यावयाला सांगितलें, आज्ञेप्रमाणें दासी पैसे आणावयास आंत गेली. इकडे राजकन्या आपल्या सख्यांला म्हणाली—सख्यांनो, या अशा अमल, एक खेळ खेळूं.

रंगप्रिया सख्या म्हणाल्या—कोणता खेळ खेळावयाचा बरें सखे?

राजकन्या—खेळबिळ हाच कीं; ही औरंगजेबाची तसबीर मी जमिनीवर ठेवितें आणि तुम्ही सर्वजणी हिच्यावर एक एक लाथ मारा! पाहूं बरे कोणाच्या लाथेनें ह्याचें नाक फुटतें तें!!

राजकन्येचे हे शब्द ऐकून सर्व सख्या भीतीनें गर्भगलित झाल्या व कित्येक उघड उघड म्हणूं लागल्या कीं, सखे! अशी गोष्ट पुनः तोंडाबाहेर देखील काढूं नको. बादशाहाला ही बातमी समजली तर तो सर्वस्वी आमचा नाश करील. व ह्या रूपनगरचा विध्वंस करून आह्मांला देशोधडीस लावील!!

चंचलकुमारीनें तिकडे लक्ष न देतां ती तसबीर हंसत हंसत जमिनीवर ठेविली व त्यावर पाय ठेवून सख्यांला ह्मणाली हं या; ज्यांना लाथ मारावयाची असेल त्या?

एकीचें देखील धैर्य झालें नाहीं! निर्मला नामक एक सखी पुढें येऊन तिनें राजकन्येचा हात धरला व ह्मणूं लागली कीं, सखे! हें काय भलतेंच?

राजककन्या दृढ निश्चयी, तिनें अगदीं न घाबरतां आपला नुपुरादि अलंकारांनीं भूषित कोमल पाय तसबिरीवर ठेवला, व अंमळ दाबलें तोंच, ती हिंदुद्वेष्ट्या मुसलमान दिल्लीपतीची ( औरंगजेबाची ) तसबीर एका क्षणांत फुटून तुटून मातींत मिळाली.

ह्या वेळीं सर्व सख्या अगदीं घाबरून गेल्या. वाईट झालं, सर्वस्वी नाश झाला, हेंच सर्वांच्या मुखांतून निघूं लागलें.

राजकन्या हंसून ह्मणाली जशीं लहान मुलें बाव्हल्यांचा संसार रचून त्यावरच आपली हौस फेडितात, तशी आज मीही आपली हौस प्रत्यक्ष तर नाहींच, पण नुसत्या तसबिरीवर तरी लाथ मारून अंशतःफेडि-

हो! असें ह्मणून निर्मला नामक सखीकडे वळून ती तिला ह्मणाली कीं हे सखे, मुलें बाहुल्यांशीं खेळतांना ज्या ज्या कल्पना करीतात, त्या त्या पुढें तीं मोठीं झाल्यावर जशीं खरोखर अनुभवतात, त्याप्रमाणेंच माझ्याहि ह्या खेळाचा प्रत्यक्ष अनुभव मला मिळून मी खरोखरीच औरंगजेबाच्या तोंडावर अशीच * * * * *

निर्मला सखीनें राजकन्येला पुरते शब्द न बोलूं देतां तिच्या तोंडावर हात ठेविला, तरी ती पुढें काय ह्मणणार होती तें प्रत्येकजणीला समजल्यावांचून राहिलें नाहीं.

बिच्यारी ह्मातारी तर भयानें थरथर कांपूं लागली! इतक्यांत तसबिरांची किंमतही चुकती झाली, मग ह्मातारी तेथें कशाला थांबते? मागल्या पायींच तेथून निघून बाहेर आली; तिच्या मागून निर्मलाही आली व ह्मातारीच्या हातावर एक मोहर ठेवून ही झालेली गोष्ट कोठें न बोलण्याबद्दल तिला सांगूं लागली. म्हातारीनेंही अभय दिलें व दोघीही आपापल्या मार्गास लागल्या.

# भाग तिसरा.



## इकडची तिकडे.

चित्रें विकणाऱ्या म्हातारीचें घर बुंदी नामक शहरांत होतें व देशोदेशीं चित्रें विकीत फिरण्यापरतें निर्वाहाचें दुसरें कांहीं साधन तिला नव्हतें. तिचा एक मुलगा होता, तो दिल्लीमध्यें चितान्याचा धंदा करीत असून हल्लीं कांहीं कामानिमित्य गांवीं आला होता. म्हातारी रूपनगराला कोणत्या कुयोगावर गेली होती तें नकळे! तिनें तेथें चंचलकुमारीचें जें कांहीं साहसकर्म पाहिलें होतें, त्याचें वर्णन कोणाला तरी सांगितल्यावांचून तिच्यानें खाल्लेलें अन्न देखील जिरवेना! निर्मला तिला जर गुप्तस्फोट न होण्याकरितां लांच न देती, तर कदाचित म्हातारीचें मन एवढें व्यग्र झालें नसतें. पण जी गोष्ट गुप्त ठेवण्याकरितां तिला लांच मिळाला, ती कशी—कोणत्या रितीनें—गुप्त राहूं शकते? पण म्हातारी करते काय? एक तर गोष्ट गुप्त ठेवण्याबद्दल वचन दिलेलें, दुसरें, तें गुप्त राखण्याकरितां हात पसरून

मोहर घेतलेली! तशांत आणखी हेंही भय कीं, गोष्ट फुटल्यानें बिचाऱ्या राजकन्येवर हा दुष्ट यवनाधीश ( औरंगजेब ) कहर उसळून देईल! ह्या कारणाकरितांच ह्मातारी हा वेळपावेतों कोणाजवळ बोलली नाहीं. पण तिच्या पोटांत ही गोष्ट कशी पचणार? दुसरे दिवशींच ह्या गुप्तगोष्टीच्या अजिर्णानें ह्मातारीची तहानभूक हरपली, झोंपही येईना? गुप्तगोष्ट पोटांत डंवचूं लागल्यामुळें एके दिवशीं आपल्या मुलाजवळ सहज बोलतां बोलतां रूपनगरांत घडलेली सारी हकीगत ह्मातारीनें सांगितली! सांगून तर चुकली; पण ती गुप्त ठेवण्याबद्दल आणाशपथा वाहूं लागली. त्यानेंही तिचें ह्मणणें मान्य आहे असें दर्शविलें.

आठ पंधरा दिवस लोटले. ह्मातारीचा मुलगा पुनः दिल्लीस आला व आईच्या गुप्त गोष्टीचा पाडा आपल्या उपपत्नी ( वेश्ये ) जवळ सांगितला आणि तो गुप्त राखण्याबद्दल तिला बजावून सांगितलें. पण उपपत्नी कोणाची? तिनें दुसरे दिवशींच आपल्या एका सोबतिणीजवळ सर्व मजकूर सांगितला आणि ती सोबतीण तिसरे दिवशीं बादशहा ( औरंगजेब ) च्या अंतःपुरांत

नौकर झाली व हळूं हळूं तिनें रूपनगरची ऐकिलेली गोष्ट आपल्या बरोबरीच्या इतर दासींना कळविली. दासींच्या तोंडानें बहुतेक बेगमांना व शेवटास जयपुराकडील एका बेगमेच्या तोंडानें साक्षात् कालकराल यवनाधिपती औरंगजेबास ती बातमी कळाली!!

औरंगजेबासारखा सार्वभौम बादशहा, चंचलेसारख्या अल्पवयी मुलीच्या कृतीवर करडी नजर फिरवून तिचा नायनाट करावयाचा निश्चय करील, हें कधीं तरी संभवतें? पण नाहीं! औरंगजेबाजवळ विचार, शांति किंवा दया ह्यापैकीं एक तरी वास करीत असेल तर शपथ! ह्या साऱ्या गोष्टी जयपुरी बेगमेच्या तोंडावाटे ऐकिल्या मात्र तोंच स्वारीच्या अंगाची लाही लाही होऊन रूपनगरच्या ह्या असल्या अमर्याद पोरीला चांगली सक्त सजा देतों, असें ह्मणून कित्येक बेगमाकडे पहात पुनः ह्मणूं लागला कीं पहा, रूपनगरच्या त्या कंगाल राजाची ती अमर्याद पोर थोडक्याच दिवसांत तुमच्या ह्या जनानखान्यांत तुमचीं लुगडीं धुवावयाला आणून ठेवितों.

औरंगजेब बादशहाचें बोलणें ऐकुन बहुतेक स्त्रिया

भयानें कांपत हळुहळु ह्मणूं लागल्या—" जहापनाह " ज्याच्या हुकुमानें मोठमोठ्या राजांचीं राज्यें एका घटकेंत रसातळास जातात, त्या आपणासारख्या सार्वभौमाला एका यःकश्चित मुलीवर एवढा राग धरणें बरें दिसत नाहीं. बेगमांच्या बोलण्यास उत्तर देण्याच्या भरीस न पडतां बादशाहाची स्वारी किंचित् हंसून गपचिप् राहिली. पण ह्याच दिवशीं बिचाऱ्या चंचलकुमारीच्या नाशास आरंभ झाला. ज्याच्या अद्वितीय कुटिलतेच्या भयानें राजसिंह, यशवंतसिंह ह्यासारखे शूर वीर राजपुरुष सदा साशंक राहत होते, श्रीछत्रपति शिवाजीसारख्या चतुर चुडामणी नरकेसरीसही ज्याच्या कपटजाळांत अडकून दिल्लीच्या बंदीगृहांत कांहीं वेळ वास करावा लागला होता, त्या कपटपटु औरंगजेबानें रूपनगरच्या राजाच्या नांवावर असें पत्र पाठविलें कीं—" तुह्मारी दुख्तरे नेक अख्त्यारके हुस्नो जमालकी तारीफ सुनकर जहांपनाहका दिल फरेफता हो रहा है, और तुमारी नेकशहारीब फंदारीसे भी हजरते जिल्ले सुबहानी निहायत खुश हैं, लिहाज चाहते हैं कि दूरे मज्कूर को हरमें दाखील

करके तुमारी खैरखुवाहिका सिव्ह बख्से. और तुमे लाजीम् हैकि, रुख्सतका इन्तजाम कर रख्खो, फौजे-शाही बहुत जल्द भेजी जायगी." जयपूर व जोधपूर येथील मोठमोठ्या शूर ह्मणविणाऱ्या राजा महाराजांनीं देखील आपल्या मुली दिल्लीच्या यवनाधिपतीस देण्यास हरकत न घेतां त्याला कन्यादान करून, आपणांस धन्य ह्मणवून घेतलें तेथें बिचाऱ्या रूपनगराच्या क्षुद्र-जिवी विक्रमसिंहाची काय कथा?

पृथ्वीवर कोणीही ज्याची बरोबरी करूं शकत नाहीं, असा औरंगजेबासारखा सार्वभौम आपण होऊन आप-ल्या मुलीला मागणी करीत आहे, आतां आपली मुलगी पृथ्वीश्वरी होईल, यापेक्षां आपलें आणखी काय भाग्य पाहिजे; इत्यादि विचार मनांत येऊन आमचा विक्रमसिंह व रूपननगरची प्रजा यांत आनंदाचा मोठा धुमाकूळ माजला होता. व ह्या सोन्यासारख्या वेळीं कोणकोणत्या जहागिरदारांच्या जहागिरी जप्त कराव्या ह्या विचारांत विक्रमसिंह निमग्न झाले होते.

जिकडे तिकडे असा आनंद चालला होता. पण राज-कन्या चंचलकुमारीच्या सख्या मात्र उदास दिसत होत्या

कारण कीं, दिल्लीश्वराचा व विक्रमसिंहाचा शरीरसंबंध कांहीं चंचलकुमारीच्या बऱ्याकरितां नाहीं, हें त्या जाणून होत्या. व ह्यामुळें त्यांना कांहीं सुचत नव्हतें.

## भाग चवथा.



### कसें करूं ? काय करूं ?

चंचलकुमारी आपल्या खोलींत हातीं एक तसबीर घेऊन डोळ्यांतून अश्रु ढाळीत पडली होती. तोंच कोणी आल्याचा तिला भास झाला व तिनें ती हातीं असलेली तसबीर जवळच उपडी घालून ठेविली. इतक्यांत तिची सखी निर्मला तिथें येऊन तिच्याजवळ बसली व दोघींचें भाषण सुरू झालें.

निर्मला—आतां पुढें काय उपाय करावा बरं?

राजकन्या—उपाय जरी न झाला, तरी मी त्या मुसलमानाची बटीक मेल्यास देखील होणार नाहीं.

निर्मला—सखे, तुझें ह्मणणें अगदीं खरें आहे. पण बाबासाहेबांच्या अंगांत बादशहाचा हुकूम अमान्य करावयाची शक्ति आहे कुठें? मला तर वाटतें कीं,

तूं देखील अडून बसूं नयेस. कारण, जोधपूर, अंबेर इत्यादि ठिकाणचे व पृथ्वीवरील बहुतेक मोठमोठे राजे, आपली मुलगी दिल्लीपतीची अर्धांगी होऊन साऱ्या हिंदुस्थानची बादशाहीण ह्मणविली जावी, ह्या इच्छेनें ह्या यवनाधिपतीस आपापल्या मुली देण्यास एका पायावर तयार असतात. मग तुलाच साऱ्या दुनियेची मालकीण होण्याचा कंटाळा कां आला, तें कळत नाहीं.

सखीची ही उक्ति ऐकून चंचला अगदीं संतापून जाऊन तिला ह्मणाली, चल निघ येथून!

अशा वेळीं जर हिला साह्य न केलें, तर आपलें जिणें व्यर्थ, असा विचार करून निर्मला राजकन्येस ह्मणाली-सखे, अशी रागावूं नकोस; विचार कर कीं, ज्याच्या अन्नानें ही मी पोळासारखी वाढलें आहे, त्याचें जर हित माझ्या हातून कांहींच झालें नाहीं, तर मग माझ्या जन्माचें सार्थक तरी काय? तूं दिल्लीस गेली नाहींस तर तुझ्या बापाची काय गति होईल, त्याची कल्पना तरी तुला आहे कां!

चंचला—होय, मी जर दिल्लीस गेलें नाहीं, तर बाबासाहेबांचें शिर धडावर राहणार नाहीं व रूपनग-

शाची राखरांगोळी होऊन ह्या राजवाड्याची एक वीट देखील दृष्टीस पडणार नाहीं. पण सखे, मी इतकें होऊंच कशाला देतें. बादशाहाच्या फौजेबरोबर दिल्लीस जाईन, म्हणजे तर झालेंना?

निर्मला--( हंसून ) माझी तरी हीच इच्छा होती.

चंचला--काय? मी दिल्लीस जाऊन त्यापाशीं मोंगलाची दासी व्हावें, अशी तुझी इच्छा आहे काय? अगे हंसी हंसाला सोडून बगळ्याला कधीं वश होईल का?

राजकन्येच्या ह्या बोलण्याचा खोल अर्थ निर्मला न समजतां म्हणाली, तर मग काय करणार?

चंचलेनें बोटांतून एक अंगठी काढून तिला दाखविली व म्हणाली, समजलीस-दिल्लीच्या वाटेंत ही माझी सोबतीण!

अंगठी विषानें भरली आहे, हें मनांत येऊन निर्मला बावरून म्हणाली, आणखी कांहीं उपाय नाहीं?

चंचला—मग आणखी कोणता उपाय? मला वाचवावयाकरितां दिल्लीपती औरंगजेबाशीं वैर जोडणारा वीर पृथ्वीवर कोणी तरी आहे का? हे मेले

रजपूत तर त्याचे दास होऊन आपापल्या मुली त्याला बळी देत आहेत, मग मजकरितां आतां कोण बरें धांवणार! नाहीं ह्मणायला **संग्रामसिंह, प्रतापसिंह,** मात्र होते; पण ते तर स्वर्गांतून ह्या दुष्टांची लीला पहात आहेत. ते मज अनाथ अबलेकरितां थोडेच खालीं येणार आहेत!

**निर्मला**—सखे, ते जिवंत जरी असते, तरी परक्याकरितां का ते आपलें सर्वस्व घालवून बसले असते? पहा, **प्रतापसिंह, संग्रामसिंह** जरी ह्या पृथ्वीवर नाहींत, तरी क्षत्रियचूडामणि **राजसिंह** तर तुझें रक्षण करण्यास समर्थ आहेना? पण तो तरी तुझें रक्षण करून आपणांवर विपत्तीचा लोट कां ह्मणून आणून घेईल? तशांत, तूं त्याच्या कुळांतील नसून **मारवाड** कुळांतील आहेस.

**चंचला**—मी त्यांच्या कुळांतली नसल्यें तरी, शूर पुरुषांच्या भुजेंत बळ असून शरण आलेल्याचा ते अव्हेर करितील, हें संभवतें काय? आणि ह्मणूनच मी त्या **संग्रामसिंह** कुळतिलकाला ( राजसिंहाला ) शरण जावयाचा बेत केला आहे, मग ते तारोत अथवा मारोत.

असें ह्मणून चंचलकुमारीनें छपवून ठेवलेली तसवीर उघडी केली; व निर्मलेनेही ती पांहतांच ही राजसिंहाची तसबीर आहे असें ओळखिलें. राजकन्या चंचलकुमारी ती तसबीर दाखवून सखीस ( निर्मलेस ) ह्मणाली—सखे, हें पहा, ह्यांच्या ह्या मुखावलोकनानें 'मजसारख्या अनाथ अबलेचा पक्ष घेऊन हे माझें रक्षण करितील' असं तुला वाटत नाहीं काय?

निर्मला ही मोठी बुद्धिमान् असून राजकन्येवर तिचें अप्रतिम प्रेम होतें. तिनें विचारदर्शीपूर्वक चंचलेकडे पाहून ह्मटलें—बरें, तर सखे, जो वीर तुझें रक्षण करील त्याला कांहीं बक्षीस मिळेल कीं—

चंचला, सखीचे मनोगत जाणून ह्मणाली—गडे, मी काय बरं देऊं? मज अबलेजवळ आहे काय त्यांना द्यावयाला?

निर्मला—तुजजवळ कांहीं नाहीं तें तर खरंच, पण तूं तर स्वतः आहेसना?

चंचला—( लाजून ) हेंग काय मेलं!

निर्मला—कां बरं राजे लोकांत ही कांहीं नवीन गोष्ट

नाहीं! तूं रुक्मिणी व्हावयाचा निश्चय कर कीं, श्रीकृष्ण तुला साह्य करतो कीं नाहीं तें पहा!

चंचला--( नम्र भावानें ) गडे, तेव्हढं भाग्य माझं आहे कुठं? मी तर हा देह त्यांना अर्पण करावयास तयार आहें, पण ते अंगिकार करतील तेव्हांना!

निर्मला--होय, तें त्यांच्या स्वाधीन आहे खरं, पण मला वाटतें, त्यांच्याकडे कोणी दूत पाठवावा, ह्मणजे सगळं ठीक जुळेल. मात्र ही गोष्ट अगदीं गुप्त रीतीनें झाली पाहिजे.

चंचला कांहीं वेळ विचार करून ह्मणाली--सखे, गुरुमहाराजांना बोलावून आण. कारण, त्यांच्यावांचून ह्या समयीं आपला हितचिंतक कोणी नाहीं. पण गडे, तूं त्यांना पहिल्यानेंच साऱ्या गोष्टी समजावून दे बरं? मला बाई, त्यांच्याजवळ बोलावयाला लाज वाटते मेली! तें ऐकून निर्मला तेथून हळूं हळूं श्वास टाकीत निघून गेली.

# भाग पाचवा.

## अनंतमिश्राची तयारी.

अनंतमिश्र हे चंचल कुमारीच्या बापाचे कुलगुरू. राज्यकन्येवर ह्यांची प्रीति कन्येप्रमाणें. त्यांना चंचल कुमारिकेनें पाठविलेला निरोप समजतांच मागल्यापायीं ते राजमहालाकडे आले. राजमहालांत कोठेंही जावयास त्यांना अटकाव नव्हता. सारें आंग विभुतीनें माखलेलें, कपाळ रुंद, अंगाचा पिंडही अमळ स्थूळ असून गळ्यांत रुद्राक्ष्यांच्या माळा असा तो आनंदी प्राणी ( अनंतमिश्र ) निर्मळेसह चंचलेच्या महालांत आला.

चंचला ह्या वेळेस अश्रु ढाळीत बसली होती. तरी दुसऱ्याला आपलें दैन्य दाखविण्याचें तिचें ब्रीद नसल्यामुळें तिनें तें रडें दाबून गुरुजींला बसावयास आसन दिलें. मार्गांत गुरुजींला निर्मळेनें सारें वर्तमान सांगितलें होतें, तरी गुरुजी तिला विचारतात—मुली, मला कशाकरितां बोलाविलंस बरें?

चंचला—गुरुमहाराज, ह्या दीन मुलीचें रक्षण करणारें आपल्यावांचून दुसरें कोणी नाहीं.

अनंतमिश्र पुरोहितानें हंसून उत्तर दिलें–मुली रुक्मिणीची पत्रिका घेऊन वसुदेव ब्राह्मण जसा द्वारकेस कृष्णपरमात्म्याकडे गेला होता, त्याप्रमाणें ह्या वृद्ध ब्राह्मणासही गेलें पाहिजे. समजलीसना? वाटखर्चीसाठीं मला कांहीं दे, ह्मणजे मी उदेपुरास गेलोंच समज.

चंचलेनें लगेच मोहरांनीं भरलेली एक किनखाबाची पिशवी पुरोहितबुवा समोर ठेविली. त्यांतून बुवानें फक्त दोन मोहरा घेऊन थैली परत केली व ह्मणाले, रस्त्यानें मला नुसतें अन्न लागणार, मग ह्या इतक्या पिशवीभर मोहरा कशाला हव्यात? पण माझी आणखी एक विनंती आहे. मर्जी असल्यास कळवीन.

चंचला–आपण अग्नींत पडावयाची जरी आज्ञा केली, तरी टाळणार नाहीं. पाहिजे ती आज्ञा करा!

अनंतमिश्र–राणा राजसिंहाच्या नांवानें एक पत्र लिहून देशील?

चंचला–( वरील प्रश्न ऐकून अंमळ विचार करून मनांत ह्मणाली ) एक तर मी कुलीन. दुसरें माझी त्यांशी बिलकूल ओळख नाहीं! मग मी पत्र तरी कसं

लिहावं! ( विचार करून ) पण मी जर त्यांना शरण जाऊन भिक्षा मागत आहें, तर मग लज्जा ठेवून काय होणार? ( उघड ) पत्र लिहावंच लागेल नाहीं बरं!

अनंतमिश्र–तूं जर लिहूं शकत नसलीस तर मी लिहून देतों!

चंचला–नाहीं, नाहीं आपण सांगा मी लिहित्यें.

निर्मला हा वेळपावेतों उगीच स्तब्ध उभी होती. ती आतां पुढें होऊन ह्मणाली, हें कांहीं ब्राह्मणाचें काम नव्हे. आपण घरीं जाऊन आपली तयारी करून या; तोंपर्यंत मी पत्र वगैरे लिहवून तयार ठेवित्यें.

पुरोहित ( अनंतमिश्र ) उठले. ते घरीं न जातां प्रथम राजाकडे ( विक्रमसिंहाकडे ) जाऊन ह्मणूं लागले कीं, राजन्; मी आतां कांहीं दिवसपर्यंत देशपर्यटनास जाणार, ह्मणून तुझ्या भेटीस आलों आहें; राजानें विचारलें, पण महाराज, कोणत्या कामाकरितां व कोठपर्यंत जावयाचा विचार आहे?

अनंतमिश्र ह्या कामासंबंधीं कांहीं गोष्ट न काढतां ह्मणाले, असाव उदेपुरापर्यंत जाईन, ह्मणतों. तेव्हां परिचयाकरितां ह्मणून एखादें पत्र राजसिंहास देशील

तर बरें होईल. राजानें पत्र लिहून दिलें व मिश्र महाशय तें घेऊन पुनः राजकन्येच्या महालांत आले. निर्मला व राजकन्या ह्या दोघींनीं पत्र लिहून ठेविलेंच होतें, तें व मोत्यांचा कंठा पुरोहितबुवास ( अनंतमिश्रास ) देऊन सांगितलें कीं, हें पत्र त्यांना दिल्यावर माझी भेट ह्मणून हा कंठा त्यांचे गळ्यांत घालावा. ते रजपुतकुलभूषण असल्यामुळें ह्या रजपुत कन्येचा अनादर करणार नाहींत.

अनंतमिश्र "बरें आहे" असें ह्मणून राजकन्येचा निरोप घेऊन निघून गेले.

---

## भाग सहावा.

---

### लुटारूंची धाड.

पुरोहित अनंतमिश्र घरीं जाऊन वस्त्र प्रावरण, छत्री, काठी, इत्यादि अवश्य लागणारें सामान घेऊन उदेपुरास जावयाची तयारी करूं लागले. त्यांच्या नायकोनें "ही तयारी कोठली व कशाकरितां आहे,"

वगैरे विचारिता त्यानें तिला उदेपुरास राजाचें कांहीं आश्रय मिळण्याचे संधान आहे, ह्मणून तिकडे जातों असें सांगितलें. राजाश्रयाच्या संधानाची गोष्ट ऐकून अनंतमिश्राचें कुटुंब शांत झालें. तिनें, होणाऱ्या द्रव्य लाभाच्या आशारूपी वृष्टीनें पतीविरहज्वाला विझविली. अनंतमिश्रही तिचा निरोप घेऊन उदेपुरच्या मार्गास लागले.

रूपनगराहून उदेपुरास जाणारा रस्ता फार भयंकर व डोंगराळ असून, त्याचे ते चढणारे व उतरणारे घाट खरोखरच मोठे कठीण होते. मध्यें कोठें वाटसरू उतरेल तर उतरावयासाठीं ठिकाणाचीही मारामारच! रस्त्यामध्यें लुटारू लोकांची भीती विशेष असल्यामुळें व जवळ कंठा वगैरे मौल्यवान वस्तु असल्यामुळें अनंतमिश्र चुकून सुद्धां एकटे चालत नसत. एकदां रात्रीस एका देवळांत विश्रांतीस उतरून, कोणी साथी मिळेल काय, ह्मणून अनंतमिश्र वाट पहात होते, तोंच, सुर्योदयाचे सुमारास चौघे व्यापारी, ज्या मार्गानें ह्यांला जावयाचें होतें त्याच मार्गानें जातांना त्यांच्या दृष्टीस पडले. अनंतमिश्र ही संधि पाहून लगेच त्यांचे बरोबर त्या रस्त्यानें चालूं

लागला. त्या चौघांनीं ह्याला पाहून "कायहो भटजी, कुठें जाणार?" ह्मणून विचारिलें व त्यानेंही "मी उदेपुरास जातों" ह्मणून सांगितलें, "आह्मालाही उदेपुरास जाणें आहे तेव्हां चला, सोबतीनेंच जाऊं" हें त्या मुसाफरांचें बोलणें ऐकून आमचे ब्राह्मणबुवा मनांत समाधान मानीत त्यांचेबरोबर चालूं लागले. कांहीं दूर गेल्यावर अनंतमिश्र ह्मणाला, उदेपूर किती दूर आहे हो?

व्यापारी—फार दूर नाहीं, तरी संध्याकाळपर्यंत आपण तेथें पोहचूं. ही उदेपुरचीच हद्द आहे.

अशा गोष्टी करीत हे पांचही प्रवाशी चालले होते. डोंगराळ रस्ता, उंच सखल जमीन, मार्गांत दूरवर मनुष्यवस्ती नाहीं, असा बराच रस्ता चालल्यावर डोंगराची उतरण लागली. व जवळच मैदान आहे असें वाटलें. इतक्यांत, हे सारे प्रवाशी डोंगराच्या एका खिंडीशीं आले. ह्या खिंडीच्या दोहोंबाजूस डोंगराचे उंच उंच कडे तुटलेले असून, आसपास जंगल बरेंच वाढलें होतें व मधून एक लहानसा ओढा वहात होता. त्या ओढ्याच्या कांठाकांठानें एक पुसटसी पाऊलवाट

वर सांगितलेल्या जंगलांत गेली होती. त्या वाटेनें जाणारांला डोंगरावर चढल्याखेरीज कोणीही पाहूं शकत नसे.

ह्या अडचणीच्या भयंकर ठिकाणीं पोहचतांच त्या चौघांपैकीं एकानें "भटजी, तुमच्याजवळ किती धन आहे हो?" असा अनंतमिश्रास प्रश्न केला. धनाचें नांव घेतांच, बिच्यारा ब्राह्मण भयानें घाबरून गेला व मनांत समजला कीं, येथें लुटारू लोकांचें भय असल्या-मुळें मला हे कदाचित् सावध करीत असतील! ह्मणून उत्तर दिलें—बाबांनो, मी भिक्षुक ब्राह्मण, मजजवळ धन कोठचें असणार?

व्यापारी—पण ब्राह्मणबुवा, जें असेल तेंच मजज. वळ द्या, नाहीं तर तें तुमच्याजवळ राहणार नाहीं बरें!

अनंतमिश्र घाबरून आढेवेढे घेऊं लागले घटकेंतच. त्यांना असें वाटें कीं, आपलेजवळ असलेला मौक्तिकहार (कंठा) याजजवळ दिल्यास ह्या अडचणीच्या जागेंत तो सुरक्षित तरी राहील. पण, पुनः "यानी गड्याशीं ओळख ना देख, मग ह्याचा विश्वास तरी काय?" असाही विचार त्यांच्या मनांत आला; व ते ह्मणाले

अहो, मी भिक्षा मागून पोट भरणारा मजजवळ कोठलें धन येईल ?

विपत्तीकाळांत अडेवेढे घेऊन सतरा वाटेनें जाणारा जसा फजित होतो तद्वतच बिचाऱ्या अनंतमिश्राची स्थिति झाली. त्यापान्थांचा वेश घेतलेले चौघे मुशाफर नसून ते त्या रानांत राहणारे लुटारू होते. त्यानें ह्याची ती चलबिचल स्थिति पाहून ताडलें कीं, ब्राह्मणाजवळ अवश्य कांहीं तरी धन असावें. मग काय उशीर, त्या चौघांपैकीं एकानें अनंतमिश्राला गचांडी देऊन पाडिलें, दुसरा त्यांच्या उरावर बसला व तिसऱ्यानें त्याचें तोंड दाबून धरिलें! बिचाऱ्या अनंतमिश्राला बोलण्याचेंही सामर्थ्य राहिलें नाहीं. लुटारूपैकीं एकानें त्याचें गाठोडें सोडून पाहिलें, तों त्यांत एक रत्नजडित मोत्यांचा कंठा, दोन पत्रें व दोन मोहरा निघाल्या. तें सर्व घेऊन तो आपल्या सोबत्यास म्हणाला, जी कांहीं पुंजी होती, ती तर हातीं आली. आतां ब्राम्हणाचा जिव घेण्यांत कांहीं अर्थ नाहीं. याला सोडून द्यावें; नाहीं बरें ! त्यावर दुसरा म्हणाला—"वाहवारे, ह्याला सोडून दिलें व ह्यानें बोंब मारिली म्हणजे ? ठाऊक नाहीं; आजकाल राणा राज-

सिंहाचा काय दरारा आहे ! अरे त्याच्या व्यवस्थेमुळें तर आपल्यासारख्या वीरांना खावयास मिळण्याची पंचाईत पडूं लागली आहे ! ह्यासाठीं सोडून देणें चांगलें नव्हे ! ह्याला एखाद्या झाडाला बांधून येथून सुंबाल्या ठोकूं म्हणजे आटोपलें. " ही युक्ती सर्वांना रुचली व त्यांनीं अनंतमिश्राचें तोंड व हातपाय बांधून जवळच्या एका लहानशा झाडास त्याला बांधून ठेवलें, व ते सर्वजण तीं दोन पत्रें, मोहरा व कंठा यांसह मागें सांगितलेल्या ओढ्याच्या कांठानें जंगलांत जी पाऊलवाट गेली होती, तिनें जाऊन घटकेंत अदृश्य झाले.

हें सर्व चरित्र जवळच्या डोंगरावरून एक घोडेस्वार पहात होता. लुटारू लोकांचें तिकडे लक्ष नसल्यामुळें, ते माल घेऊन जवळच्या पाऊलवाटेनें निघून गेले, हें वर सांगितलेंच आहे. पण लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, डोंगरावरील घोडेस्वार आडमार्गानें लपत छपत लुटारू लोकांच्या मागून चालला होता. लुटारू कांहीं दूर गेल्यावर, ती पाऊलवाट सोडून आडरानांत शिरून जवळच असलेल्या एका गुहेंत जाऊन लपले. ह्या गुहेंत खाण्यापिण्याचा व निजण्याचा बसण्याचा सर्व बंदोबस्त

होता. एक पाण्याची घागरही भरून ठेविली होती. ह्यावरून, हे लुटारू कधीं कधीं येथें रहातही असावेत असा पहाणाराचा तर्क होई. हे लुटारू लोक ह्या गुहेंत येऊन तमाखू वगैरे पिऊं लागले. एकजण स्वयंपाकाची तजवीज करूं लागला, तेव्हां एकजण ह्मणाला, माणिकलाल, स्वयंपाकबियंपाक मग होईलरे, आधीं मालाचा बंदोबस्त करून टाकूं. माणिकलाल ह्मणाला—बरें, तसेंच कां होईना. असें ह्मणून मोहरांचे चार तुकडे केले व प्रत्येकाच्या एक एक स्वाधिन करून मोत्यांचा कंठा विकून त्याची जी किंमत येईल तीही वाटून घेण्याबद्दल त्यांचा विचार ठरला. व पत्रें काय करावींत याची भवतिनभवति चालली. एक ह्मणाला, अहो, कागदाचें काय करणार! टाका जाळून, ह्मणजे आटपलें. असें ह्मणून तीं पत्रें माणिकलालाकडे फेंकलीं. माणिकलाल थोडें लिहिणेंवाचणें जाणत होता, त्यानें तीं पत्रें उघडून वाचलीं व ह्मणाला—अहो, या पत्रांच्या योगानें तर नोकरी मिळूं शकते! मग यांस जाळतां कां बरें? हें ऐकून, जो तो "काय आहे" ह्मणून विचारूं लागला. माणिकलालानें पत्रांतील मजकूर व चंचल-

कुमारीची माहिती सर्वांस सांगितली. ह्यामुळें तिघेही लुटारू आनंदित झाले. माणिकलाल पुनः ह्मणाला, हीं पत्रें राणा राजसिंहाला जर दिलीं तर बरेंच इनाम मिळेल. त्यावर दुसरा लुटारू ह्मणाला तूं मूर्ख तर नाहींस? राणेसाहेबांनीं हीं पत्रें पाहून, "हीं कोठें सांपडलीं" असा प्रश्न केला, तर मग काय सांगणार? वाट मारून हीं आणलीं आहेत असें सांगून आयतेंच बिनभाड्याचें घर पहाणार कीं काय? माझ्या मतानें तर हीं पत्रें बादशहाला (औरंगजेबाला) द्यावींत; ह्मणजे ही एक कामगिरी आपण बजाविलीसें होऊन कदाचित् एखादी जहागिरीसुद्धां आपणास मिळेल. हें त्याचें बोलणें पुरें होत नाहीं तोंच तिघांचीं शिरें धडापासून वेगळीं झालीं.

---

## भाग सातवा.

### महाराज राजसिंह.

जवळच्या डोंगरावरून एक घोडेस्वार लुटारू लोकांचें चरित्र पहात होता, हें आमचे वाचक अजून विसरले

नसतील. चौघेजण एका मनुष्यास झाडाशीं बांधून पळत आहेत, हें पाहून, ते कोणीकडे जातात, हें तो घोडेस्वार पाहूं लागला. नाल्याच्या कांठानें गेलेल्या पाऊल वाटेनें जाऊन ते दिसेनासे झाल्यावर घोडेस्वार आपल्या घोड्यावरून उतरला व घोड्याच्या पाठीवर हात ठेवून ह्मणाला, "विजया, मी येईपर्यंत तूं येथेंच गपचिप उभा रहा. लिंकाळूं नकोस बरें?" तो गंभीर घोडा मालकाचे हे शब्द ऐकून तेथेंच स्थिरभावानें उभा राहिला व स्वार तेथून तीव्र वेगानें डोंगराच्या पायथ्याशीं ( जेथें अनंतमिश्राला बांधून ठेविलें होतें ) येऊन त्यानें पहिल्यानें अनंतमिश्राचें बंधन मोकळें केलें. व हें कसें झालें ह्मणून त्याला प्रश्न केला. अनंतमिश्रानें लुटारूंची सर्व हकीकत सांगेली.

स्वार—पण तुमच्याजवळ असें होतें तरी कायहो?

अनंत०—फार कांहीं नाहीं. एक मोत्याचा कंठा, दोन मोहरा व दोन पत्रें.

स्वार—येवढेंचना? मग बसा तर तुह्मी अमळ येथें। त्यांचा शोध लावून हा मी आतां आलोंच समजा.

अनंत०—त्यांचा शोध? तुह्मी एकटे, आणि ते चौघे.

स्वार—असेनात असले तर. काय चिंता आहे! हा रजपूत बच्च्या त्यांची थोडीच फिकीर करितो आहे!

अनंतमिश्रानें त्या स्वाराकडे निरखून पाहिलें, तों त्याच्या कंबरेस एकीकडे तरवार लटकली आहे, दुसरीकडे तमंचा आहे व हातीं भाला आहे, असा बादशाही थाट त्याच्या दृष्टीस पडला, बिचारा अनंतमिश्र हा थाट पाहतांच मनात भिऊन गेला. लुटारू ज्या वाटेनें गेले होते, त्याच वाटेनें तो स्वार लगबगीनें जाऊं लागला. पण कांहीं दूर गेल्यावर, ज्या वाटेनें तो आला होता ती वाट पुसट दिसूं लागली. पुढें कोणत्या रस्त्यानें जावें हेंही समजेना व लुटारूचीही कोठें चाहूल लागेना. ह्मणून, तो स्वार डोंगरावर चढून इकडे तिकडे दृष्टि फिरवूं लागला, तेव्हां थोड्या अंतरावर चौघेजण आड वाटेनें जात आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें.

थोडें दूर गेल्यावर ते डोंगराच्या पायथ्याशीं पोंहचून तेथून दिसेनासे झाले, हें त्या स्वारानें पाहून तो मनांत समजला कीं, हे चौघेही वाटपाडे तितक्यांतच

कोठें तरी बसले असावेत, किंवा जवळपास असलेल्या एखाद्या गुहेंत तरी लपले असावेत.

असा विचार करून वृक्षादि चिन्हांच्या धोरणानें त्या जागेचा माग काढीत तो स्वार जेथें लुटारू गुप्त झाले होते तेथें पोंहचला आणि पहातो तों, एक गुहा असून तिच्या आंत कोणी मनुष्यें बोलत आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. स्वारानें विचार केला कीं, हे चौवेजण, आणि मी एकटा! अशा स्थितींत गुहेंत प्रवेश करावा की नाहीं; गुहेंत प्रवेश केला आणि त्यांनीं द्वार रोखून मजवर हल्ला केला तर आत्मरक्षणाचा उपाय काय?

इत्यादि तर्कवितर्क त्याचे मनांत आले, पण खऱ्या रजपुताच्या मनात हे विचार कोठपर्यंत टिकणार?

आंत जाण्याचा त्याचा बेत झाला, पण पुनः हाही विचार त्याच्या मनांत आला कीं, जातां क्षणींच एक दोघांचा प्राण तर खचित घेईन, पण ते जर लुटारू नसून कोणी निरपराधी प्राणि असले, तर बिचाऱ्या गरिबांची हत्या मजवर बसेल. असा विचार करून गुहेच्या द्वाराशी येऊन आंत काय चाललें आहे, हें तो ऐकूं लागला. ह्यावेळीं गुहेंत नुकत्याच मिळवून

आणलेल्या धनाचे हिश्शाबद्दल वाटाघाट चालली होती. ह्यावरून त्या रजपूत स्वाराची पक्की खात्री झाली कीं, हेच ते लुटारू होत. मनाची खात्री होतांच हातांतील भाला एकीकडे टाकून त्या हातीं तरवार व दुसऱ्या हातीं एक भरलेला पिस्तुल घेऊन रजपूत स्वार दबत दबत गुहेंत गेला. ह्या वेळीं लुटारू राजकन्येच्या पत्रावर धनप्राप्ती कशी करून घ्यावी, याविषयीं भवतिनभवति करीत होते. स्वार गुहेंत गेल्यावर पहातो, तों एक लुटारू गुहेच्या द्वाराकडे पाठ करून गोष्टी करीत असलेला त्याच्या दृष्टीस पडला. रजपूत स्वारानें पहिल्या घडाक्यानें त्यावर वार करून त्याचें शिर धडापासून वेगळें केलें.

इतक्यांत, त्याजजवळ बसलेला दुसरा लुटारू मागें वळून पहाणार, तोंच त्याच्या मस्तकावर भीमाच्या गदेप्रमाणें एक लाथ बसली! त्यासरशी तो तिरमिरी घेऊन जो पडला तो पडलाच. राहिलेल्या दोघांजणांतून एकानें एक भला मोठा दगड उचलला, तोंच त्यालाही भुईवर पाडलें. फक्त मागील भागांत सांगितलेला, **माणिकलाल ( लुटारू )** राहिला. त्यानें आपल्या सोबत्याची

ही अवस्था पाहून स्वसंरक्षणाचा मार्ग न जाणतां एक-दम धूम ठोकीत रानाचा मार्ग धरिला; पण स्वार कोठें त्याला सोडतो आहे? माणिकलाल पुढें व रजपूत स्वार मागें. असे ते धांवत असतां माणिकलालाचा पाय स्वारानें पूर्वी लपवून ठेविलेल्या भाल्यावर पडला व त्यानें झटदिशी तो उचलून हातीं घेऊन मागें लाग-लेल्या रजपुत स्वाराकडे मोर्चा फिरविला, व ह्मणूं लाग-ला—महाराज, आतां गपचिप मार्गी वळून चालते व्हा, आपणास मी ओळखतों. आपण याउपर जर पुढें निच्छा करायला पाऊल टाकाल, तर ह्याच भाल्यानें छेदून टाकीन.

"तुझ्यानें तें काय होणार आहे ह्मणा" असें ह्मणून स्वरानें हातांतील बार भरलेला तमंचा त्यावर सोडला. ह्या आघातानें माणिकलालाच्या हातातून भाला खालीं पडला, तोच तो रजपुत स्वारानें झडकन् उचलून घेऊन मोठ्या शिताफीनें त्या लुटारूची शेंडी धरिली व तरवार काढून आता शिरच्छेद करणार, तोंच तो लुटारू ह्मणाला—"महाराज, माझे प्राण वांचवा, मी आपणाला शरण आहें." रजपुत स्वारानें तरवार मागें घेतली व ह्मणाला, मरणाला इतका कां भितोस? असें ह्मणून

हातांत असलेली त्याची शेंडी सोडून दिली. **माणिकलाल** ह्मणाला–महाराज, मी मरणाला मुळींच भीत नाहीं. पण घरीं माझी एक लहानशी मुलगी आहे; तिची आई लहान असतांच मेली, यामुळें तिच्या खाण्यापिण्याच्या व्यवस्थेपासून सर्व व्यवस्था मलाच करावी लागते. पहाटेस तिला खाऊं घातलें होतें, आतां संध्याकाळीं पुनः घालीन. तिचें रक्षण मजवरच अवलंबून असल्यामुळें, मी मेलों तर ती वाचणें कठीण आहे. याकरितां प्रथम तिला मारून टाका; मग मला मारण्यास कांहींच उशीर नाहीं.

माणिकलाल असें बोलत असतां त्याच्या डोळ्याला पाणी आलें. तें पुसून तो पुनः बोलूं लागला–पृथ्वीराज, आपल्या पायाची शपथ वाहून प्रतिज्ञा करितों कीं, आतां फिरून हा वाटपाड्याचा धंदा मी करणार नाही! आजन्मपर्यंत आपली चाकरी बजावीन. ईश्वर करील तर माझ्याही हातून आपली कामगिरी कांहीं घडून येईल!

**रजपूत स्वार**—पण तूं मला ओळखतोस कां?

**माणिकलाल**–होय महाराज, उदयपुराधीश महाराणा राजसिंहाला कोण बरें ओळखणार नाहीं?

**महाराज राजसिंह** ह्मणाले–बरें तर तुला जीवदान

आहे. पण तूं ब्राह्मणाचें धन हरण केलेंस, ह्मणून तुला शिक्षा न करितां सोडून देणें हें राजधर्माच्या विरुद्ध आहे!

माणिकलाल—महाराज, हा माझा पहिलाच अन्याय असल्यामुळें मला कडक शिक्षा होऊं नये. असें ह्मणून कमरेस असलेली सुरी काढून आपल्या करांगुळीवर मारिली. पण त्या सुरीच्या अघातानें करांगुळी तुटून पडली नाहीं, ह्मणून पुनः त्यानें करांगुळीवर सुरी ठेवून वर एक दगडाचा धडाका दिला! करांगुळी तुटून निराळी पडली!! तें पाहून माणिकलाल ह्मणाला, "झालाना महाराज दंड?" आपल्या हातानें आपलें अंग भंग करून ज्यानें तोंड देखील वांकडे केलें नाहीं, अशा त्या माणिकलालाचें हें धाडस पाहून महाराणा राजसिंह फार विस्मित झाले व ह्मणाले—पुरे, झाली शिक्षा. आतां आपलें नांव सांग.

माणिकलाल—महाराज, ह्या रजपुतवंशकलंकाला माणिकलाल असें ह्मणतात.

राजसिंह—बरें तर माणिकलाल, तूं आजपासून आमचा चाकर झालास. तूं आपली मुलगी घेऊन उदेपु-

रास चल, ह्मणजे तुला तेथें रहावयास घर देऊन स्वारामध्यें भरती करूं. समजलास?

माणिकलालानें राजसिंहाची पायधूळ घेऊन आपल्या मस्तकास लाविली व त्यांना तेथेच थोडा वेळ थांबण्याविषयीं विनंती करून आपण गुहेंत गेला व तेथून मोत्याचा कंठा, दोन मोहरा व दोन पत्रें हीं आणून महाराजापुढें ठेवून ह्मणाला—ब्राह्मणाजवळून जें कांहीं हरण केलें तें आपल्या चरणाजवळ हजर केलें आहे. आणि हीं दोन पत्रेंही आपल्या नांवाचीं आहेत, पण तीं मीं वाचून पाहिलीं याबद्दल क्षमा असावी. राजसिंहानें तीं पत्रें उघडून पहातांच. त्यावर त्यांचेंच नांव दृष्टीस पडलें. तेव्हां तीं तशींच गुंडाळून घेऊन ह्मणाला—माणिकलाल, पत्रें वाचावयास योग्य स्थळ हें नव्हे. तीं मग वाचूं. सध्यां आमचे बरोबर चल. तुला येथले रस्ते ठाऊक आहेत. माणिकलाल 'आज्ञाप्रमाण' ह्मणून पुढें पुढें चालूं लागला व मागून महाराज राजसिंह चालूं लागले करांगुली तुटल्याचें थोडे तरी दुःख किंवा त्याबद्दल किंचित् चर्चा देखील माणिकलालनें केली नाहीं यावरून त्याच्या धारिष्टाबद्दल राजसिंहाची पक्की खातरी झाली

ह्याप्रमाणें मागें महाराज राजसिंह व पुढें माणिकलाल जंगलाच्या मार्गानें मागें सांगितलेल्या ओढ्याच्या कांठावरील एका रमणिय जागीं आले.

---

## भाग आठवा.

### चंचलकुमारीचें पत्र

ओढ्याचा खळखळाट चालला असून काठावरील रानटी झाडांवी चित्रविचित्र फुलें फुलून घमघमाट सुटला होता, व वाराही सावकाशपणें वहात होता. सारांश, ह्या वेळीं तेथें जाणाऱ्याच्या मनोवृत्ति प्रसन्न व्हाव्यात, असा तेथला देखावा होता. अशा त्या वनश्रीच्या विहारस्थलीं एका मोठ्या शिळेवर बसून महाराज राजसिंह माणिकलालानें दिलेलीं पत्रें वाचूं लागले.

पहिल्यानें विक्रमसिंहाचें पत्र वाचून पाहिलें, तों त्यांत ब्राह्मणाला कांहीं आश्रय द्यावा, असा मजकूर असल्यामुळें तें एकीकडे ठेविलें. नंतर चंचलकुमारीचें पत्र वाचावयास आरंभ केला, त्यांतील मजकूर असा होताः—

"राजन्"

आपण क्षत्रियकुलचूडामणि व आर्यमातेचें शिरोभूषण आणि मी एक अपरिचित् मतिहीन बालिका आहें; जर मी घोर विपत्तींत पडलें नसतें, तर आपणासारख्यास पत्र लिहिण्याचें साहस कधींही केलें नसतें. पण, हा प्रसंग फार भयंकर जाणून पत्र लिहिण्याचें साहस केलें आहे, त्याची क्षमा असावी. जे वृद्ध ब्राह्मणबुवा आपणाकडेस हें पत्र घेऊन येत आहेत, त्याचे कडून ही दीनदासी रजपूतकन्या असून, छे त्याशा रूपनगरच्या राजाची मुलगी आहे हें कळेलच. मी राजकन्या आहें, ह्मणून आपणासारखे षड्गुणैश्वर्यसंपन्न राजे माझा आदर करितीलच, असा अहंकार मी मुळींच करीत नाहीं. तरी पण, तसा कांहीं योगायोग येऊन मी आपल्या दयेला पात्र व्हावें अशी मात्र माझी इच्छा आहे. आपण राजपूतकुलतिलक व क्षत्रिय असल्यामुळें मी काय ह्मणतें, तें ऐकून घ्याल, अशी मला पूर्ण आशा आहे. माझ्या हतदैवामुळें, दिल्लीचा बादशहा हा मजबरोबर लग्न करावें, ह्मणून मला दिल्लीस नेणार आहे व त्याकरितां त्याचें सैन्यही लवकरच येथें येणार आहे.

पण महाराज, मी राजपुताची बेटी आहें, क्षत्रीय कुळांत माझा जन्म आहे, मग त्या म्लेंछाची दासी कशी बरें होऊं? राजहंसी ह्मणवून बगळ्याची सहचरी होऊं? महाराज, हिमालयनंदिनी गंगा कधीं तरी विहिरीला मिळेल काय? कधीं नाहीं!!

कोणत्याही खऱ्या रजपुताची बेटी म्लेंछाची आज्ञाधारक दासी कधींही होणार नाहीं; ह्मणूनच महाराज, मी असा निश्चय केला आहे कीं, त्या राक्षसी विवाहाच्या पूर्वींच विष खाऊन आत्महत्या करावी!! महाराज, ज्या दिल्लीच्या यवनबादशहांना जोधपूर, जयपूर येथील रजपूत राजांनीं आपल्या मुली देण्यांत कलंक न मानितां आपणाला धन्य मानून घेतलें, तेथें मजसारख्या दुर्बळ राजकन्येचा अहंकार काय आणि किती चालणार, हें मी जाणून आहें! पण महाराज, सूर्यनारायण अस्ताचलास गेला, ह्मणून काजव्यांनीं चमकूं नये कीं काय? किंवा शिशिरऋतूंत कुमुदिनी म्लान झाली, ह्मणून कुंदकळिकेनें उमलूं नये की काय? जयपूर, जोधपूरचीं मोठीं ह्मणविणारीं राजघराणीं आपलें कुळगौरव नष्ट करूं

लागलीं: ह्मणून लहानशा रूपनगरानें कां आपली मान-रक्षण करूं नये?

महाराज, मीं एका कवीच्या मुखानें असें ऐकिलें आहे, कीं एकदां आपले पूर्वज प्रतापसिंह वनवासांत असतां त्यांच्या पंक्तीला महाराज मानसिंह भोजन करण्याची इच्छा दर्शवूं लागले, पण प्रतापसिंहानें साफ इनकार करून ह्मटलें कीं, ज्यानें आपली बहिण मुसलमानाला दिली, त्याचे बरोबर आह्मी कधींही जेवणार नाहीं. ही गोष्ट मजसारख्या यःकश्चित् अबलेनें आपणांस कळविली पाहिजे, असें नाहीं. आपण हेंच मला सांगा कीं, आपल्या वंशांतील मुलगी यवनलोक कां वरूं मागूं शकत नाहींत? त्याचें कारण हेंच कीं नाहीं, कीं आपला वंश शूर व रणधुरंधर आहे; होय, पण हेंही कारण नव्हे. रूमशामसारखीं पृथ्वीवर सर्वमान्य व बलाढ्य राष्ट्रें आपली मुलगी दिल्लीश्वरास देण्यास कबूल असतां, आपल्या पूर्वजांनीं व आपण त्याचा प्रतिकार कां केला? आपले पूर्वज राजपूत होते, व आपणही त्यांचे वंशज आहांत, हेंच कीं नाहीं त्याचें कारण? मग मी तरी कोण आहे? प्राणाची आहुति देऊन सुद्धां

मी आपली कुलमर्यादा राखीन. प्रसंग पडल्यास प्राण देईन. पण महाराज, अजून माझें वय केवळ अठरा वर्षांचें असल्यामुळें तसेंही करावयास मन धजत नाहीं! "आपलें" रक्षण कोण करील हा विचार पुढें येतो. माझें रक्षण करण्यापुरतें माझ्या बापांत सामर्थ्य नाहीं. दुसऱ्या कोणाकडे जावें, तर आपणांवांचून इतर सारे रजपूत दिल्लीच्या मुसलमानांचे गुलाम झालेले. ते माझें रक्षण कसें करणार? मला हें पूर्णपणें माहीत आहे कीं, दिल्लीश्वराशीं युद्ध करणें सोपें नाहीं. पण महाराज, ज्या संग्रामसिंहानें बाबरानें बहुतेक राज्य हिसकून घेऊन त्याला देशोधडीस लाविलें होतें व ज्या प्रताप सिंहानें मध्यहिंदुस्थानांत अकबराच्या राजसत्तेचें नांव निशानही ठेविलें नव्हतें, त्या वीर पुरुषांच्या वंशांतले आपण आहांत, हें लक्षांत असूंद्या."

येथपर्यंत पत्रांतला मजकूर चंचलकुमारीच्या हातचा होता. पण पुढील लेख तिची सखी निर्मला हिच्या हातचा होता तो चंचलकुमारीनें वाचला होता कीं नाहीं, हें आम्हांला ठाऊक नाहीं. पण, मजकूर

मात्र असा होता. “महाराज, एक गोष्ट लिहावयास मला लाज वाटते, पण उपाय नाहीं. मी पण केला आहे कीं, जो वीर पुरुष मोंगलाच्या हातून मला सोडवील, तो जर रजपूत असेल व शास्त्रीय रीतीनें माझा अंगिकार करूं इच्छील, तर हा देह त्याला अर्पण करून मी त्याची दासी होईन.”

“महाराज, युद्ध करून स्त्री मिळविणें हा शूरांचा धर्म होय. पूर्वी, सा॒ऱ्या क्षत्रियांबरोबर युद्ध करून पांडवांनीं द्रौपदी मिळविली. फार कशाला?. रुक्मिणीची कथा आपणाला माहीतच आहे. आपण माझा उद्धार करणार नाहीं, आणि जर मला दिल्लीस जावें लागेल, तर मार्गांत विष खाऊन प्राणत्याग करीन.”

पत्र वाचल्यावर महाराज राजसिंह कांहीं वेळ विचार करून माणिकलालास ह्मणाले, काय माणिकलाल, तुझ्याशिवाय आणखी दुसरा कोणी ह्या पत्रांतील मजकूर जाणतो काय?

माणिक०—जे जाणत होते त्यांस तर आपण गुहेंतच निजवून ठेविले आहेत!

राजसिंह—हेंही एकअंशीं बरेंच झालें. बरें तर, तूं

आतां घरीं जाऊन आपल्या मुलीचा बंदोबस्त कर व लवकर उदेपुरास येऊन मला भेट. मात्र पत्राचा मजकूर कोणाला कळूं देऊं नकोस. असें ह्मणून राजसिंहानें माणिकलालाला कांहीं मोहरा दिल्या व माणिकलालही प्रणाम करून निघून गेला.

---

# भाग नववा.



## हरहर महादेव.

" आह्मी येईपर्यंत येथेंच थांबा " असें अनंतमिश्राला राजसिंहानें सांगितलें होतें, ह्मणून तो त्याची वाट पहात तेथेंच बसला होता. तरी त्याचें चित्त कांहीं स्थिर नव्हतें. जवळील सारी पुंजी लुटारूंनें लुटून नेली, राजकन्येच्या कार्यभागाला मध्येंच विघ्न आलें, आतां तिला हें काळें तोंड कसें दाखवूं, या विवंचनेंत अनंतमिश्र होता; तोंच समोरील डोंगरावर चार पांच माणसें कांहीं शोध करीत फिरत असून त्यांचा रोख आपणाकडेसच आहे, हें पाहून अनंतमिश्राचे दहा जाऊन पांचच राहिले!! लुटारूंची दुसरी

टोळी तर आली नसेल! एक वेळ जवळचें सारें देऊन वांचवों, जर ही दुसरी टोळी येऊन मला 'लाव' ह्मणून मागूं लागली, तर काय देऊन आपले प्राण वाचवूं!" इत्यादि विचारतरंगांत अनंतमिश्र असतां पर्वतावरील लोक त्याच्याकडेसच येतातसें त्याला दिसलें, मग काय विचारतां, बिचारा भोळा ब्राह्मण डोक्यावर पाय घेऊन पळूं लागला! तें पाहून लोकही 'धराधरा' ह्मणून त्याच्यामागें धावूं लागले. पण अनंतमिश्र जो जीव घेऊन पळाला, तो कोणाचे दृष्टीस पडला नाहीं. हे लोक महाराणा राजसिंहाचे सेवक असून ह्या वेळीं ते महाराण्यास शोधीत फिरत होते. रजपूत लोक शिकारीचे मोठे शोकी असतात आणि ह्मणूनच आज हे शंभर असामी आपापल्या घोड्यावर बसून राजसिंहाबरोबर शिकारीस आले असून, त्यांची शिकार पूर्ण झाल्यामुळें आतां हे उदेपुरास जावयाच्या तयारींत आहेत. इतर राजाप्रमाणें महाराज राजसिंहाला सदा सर्वदां सेवकजनांनीं घेरलेलें असण्याचा कंटाळा असल्यामुळें त्यांना दूर ठेवून कधीं कधीं ते एकटेच आपला घोडा पुढें करून छद्म वेषानें आपल्या

प्रजेची स्थिति अवलोकन करीत. आज शिकार झाल्या-नंतर सेवकजनांस दूर राहण्याची आज्ञा करून आपल्या विजय नामक घोड्यावर बसून महाराज राजसिंह एकटे येत असतां अनंतमिश्राशीं गांठ पडून पुढें काय झालें तें आमचे चाणाक्ष वाचक जाणतच आहेत.

महाराज राजसिंहाला जाऊन बराच वेळ झाला तरी ते परत आले नाहींत, हें पाहून त्यांच्या सेवकां-पैकीं कित्येकजण त्यांच्या शोधार्थ निघाले. त्यांपैकीं कांहीं स्वार डोंगरावरून खालीं उतरत असतां त्यांना महाराजाचा घोडा उभा असलेला दिसला. पण महाराज राजसिंह कोठें दिसेनात. हें काय गूढ? महाराण्यावर कांहीं संकट तर आलें नसेल? असें ह्मणून सर्वजण मोठ्या विवंचनेंत पडले. इतक्यांत अनंतमिश्र दुरू-नच त्यानां दिसले "ह्या ह्मातार्‍याला महाराण्यासंबं-धानें कांहीं तरी ठाऊक असेल तर विचारूं, चला;" असें ह्मणून हे लोक त्याच्याकडे (अनंतमिश्राकडे) जाऊं लागले. पण भटजीबुवांनीं त्यांचा रोख आपणाकडे आहे असें पाहून धूम ठोकिली. हें वर सांगितलेंच

आहे. अनंतमिश्र मिळून पळाले, यामुळें त्यांचा संशय अधिक वाढून त्याला धरण्याकरितां तेही धावूं लागले. पण अनंतमिश्र त्याना चुकवून रानांत जाऊन लपले.

इकडे महाराज राजसिंहानें चंचलकुमारीनें पत्र वाचून माणिकलालाला जावयाचा निरोप दिला व आपण अनंतमिश्राच्या शोधार्थ वळले. अनंतमिश्राला जेथें बसावयास सांगितलें होतें तेथें येऊन पहातात, तों ते तेथें नसून त्यांचे ऐवजी आपले कांहीं सरदार तेथें उभे आहेत असें त्यांच्या दृष्टीस पडलें. महाराणा राजसिंहाला पाहून सर्व सरदार मोठे आनंदित होऊन त्यांनीं जयघोष केला. विजयही आनंदानें फुरफुरत त्यांचेजवळ आला. राजसिंहानें त्याच्या पाठीवर हात फिरवून त्यावर आरोहण केलें व आपल्या सरदारांना येथें बसलेला एक वृद्ध ब्राह्मण तुम्ही पाहिला काय? म्हणून विचारूं लागले. त्यावर, जे अनंतमिश्राला धरण्याकरितां त्यांचे मागें धावले होते, त्यांनीं सांगितलें—
" होय महाराज, येथें होता, पण पळाला ! "

राजसिंह—त्याचा पत्ता लाविला पाहिजे. हें ऐकून

सेवकांनीं सर्व वर्तमान कळवून ह्मटलें; महाराज, आह्मी शोध तर पुष्कळ केला, पण पत्ता बिलकूल लागला नाहीं.

ह्या घोडेस्वारांत महाराणा **राजसिंहाचे** कांहीं सरदार व मंत्री होते. त्यानां राजसिंहानें एकीकडे बोलावून कांहीं सांगितलें व नंतर सर्वांकडे वळून ह्मणाला;

माझे प्रिय सरदारांनो,

" आज फार विलंब झाल्यामुळें आपण सर्वजण भुकेनें व तहानेनें फार व्याकूळ झालां असाल, हें मी जाणून आहें. पण आज आपल्या दैवीं उदेपुरास जाऊन अन्न पाणी घेणें नाहीं! मध्येंच एक लहानशी लढाई उद्भवल्यामुळें आपणाला ह्या डोंगरी वाटेनेंच परत फिरलें पाहिजे. ज्यांची इच्छा असेल, त्यानींच आमच्या बरोबर यावें. मी तर हा चाललों! "

असें ह्मणून महाराज **राजसिंहानें** आपला घोडा डोंगरावरील वाटेकडे वळविला. त्यांच्या मागें " महाराज राजसिंहकी जय " ह्मणून सर्व घोडेस्वारही निघाले. व डोंगरावर चढल्यावर सर्वांनी " **हरहर महादेव** " ह्मणून रूपनगराचा मार्ग धरिला.

---

# भाग दहावा.



## दिल्लीची तयारी.

अनंतमिश्र उदेपुराला जाण्यासाठीं रूपनगराहून निघाल्यावर मागें रूपनगरांत एकच धुमाकूळ उडाला. मोंगलाची ( औरंगजेबाची ) दोन हजार सेना चंचलकुमारीला दिल्लीस नेण्यासाठीं आली. हें ऐकून निर्मला भयाभित होत्साति चंचलकुमारीकडे येऊन ह्मणाली; आतां कसं होईल बरं सखे?

चंचल०—कोणाचंग?

निर्मला—तुला ठाऊक नाहीं काय? अगं तुला नेण्यासाठीं औरंगजेबाचे लोक आले आहेत; आणि गुरूमहाराज तर अजून उदेपुरासच पोंचले नसतील! राजसिंहाकडून उत्तर येईपर्यंत तुला हे लोक दिल्लीस नेतील, तेव्हां करावं तरी काय?

चंचल०—करायाचं काय! दिल्लीच्या रस्त्यानं विषखाऊन प्राणत्याग करण्यापरता दुसरा उपायच नाहीं! बाबांना मात्र त्या बादशहाच्या सेनापतीला आणखी

एक आठवडाभर थांबविण्यास सांगावें. तसें झालें तर बरें होईल.

असा विचार झाल्यावर चंचलकुमारीनें संधि साधून विक्रमसिंहाला विनंति केली कीं, मी आतां तुह्माला जन्माची अंतरणार, तुमचें आणि माझ्या ह्या बालमैत्री-णींचें मला दर्शनसुद्धां होणें कठिण पडेल, ह्मणून मी आपणाजवळ येवढीच भिक्षा मागतें कीं, बादशहाच्या सेनापतीला आणखी एक आठवडाभर राहवून घ्या ह्मणजे मी सर्वांची भेट घेऊन जाण्याची तयारी करितें.

विक्रमसिंह गहिंवरून ह्मणाले, सेनापतीला ह्मणून पहातों. ऐकल्यास बरेंच, नाहींपेक्षां मग........ह्याप्रमाणें अर्धवट बोलून निघून गेले. व यवन सेनापतीकडे जाऊन ह्या गोष्टीची चर्चा करितांच तो मोठ्या कष्टानें पांच दिवस रहाण्यास कबूल झाला चंचलकुमारीला तेवढी फुरसत मिळाल्यामुळें अंमळ बरें वाटलें.

उदेपुराहून अजूनपर्यंत कोणी आलें नव्हतें; अनंत-मिश्राचा सुद्धां ठिकाण नव्हता; नेमलेले दिवस भराभर जाऊं लागले, ततसा चंचलकुमारीचा धीर सुटूं लागला. बिचारी सखी निर्मला मात्र तिच्या जवळून हल्ली

नाहीं. दोघीही परमेश्वराची करुणा भाकीत त्या मनोमयमूर्तीला आश्रूंचा अभिषेक करूं लागल्या. चंचलकुमारीबरोबर दिल्लीस जाण्याचा हट्ट निर्मलेनें धरिला, पण तें तिचें ह्मणणें चंचला ऐकेना. ती ह्मणाली, मी केवळ तेथें मरणासाठीं जात आहें. उगीच मजबरोबर येऊन माझें दुःख कशाला दुणावितेस? निर्मला ह्मणाली, जरी तूं मजला बरोबर घेतलें नाहींस, तरी मी येथें कधींही राहणार नाहीं. मागें मागें येईन आपली! अशा विचारांत पांच दिवस निघून जाऊन सहाव्या दिवशीं बादशहाच्या सेनापतीनें दिल्लीची तयारी केली.

---

## भाग अकरावा.

### " भेट विचार "

माणिकलाल महाराणा राजसिंहाची आज्ञा घेऊन निघाला, तो मागें सांगितलेल्या आपल्या गुहेंत आला. आतां लुटारूपणाचा धंदा करण्याची त्याची इच्छा नव्हती. पण विचार जुने सोबती मेले किंवा जिवंत आहेत हें

णार ? उं:, पर्वताच्या ह्या चढउतार जागेंतून घोडे किती चालणार आहेत असे ? गांठलीं तर गांठलीं. असें ह्मणून माणिकलाल रूपनगरच्या रस्त्यास लागला. व रात्रंदिवस चालून एकदांचा रूपनगरास पोंहचला. माणिकलाल रूपनगरास पोंहचल्यावर पहातो, तों बादशहाची दोन हजार फौज गांवाबाहेर तळ देऊन पडली आहे. राजपुताच्या सैन्याचा मात्र कोठें शोध नाहीं! गावांतून सहज टेहळणी करीत असतां, " राजकुमारी उद्यां जाणार " ही बातमी त्यानें एकिली. पण ह्या बातमीमुळें माणिकलाल निराश झाला नाहीं. तो धैर्यवान व मोठा कारस्थानी पुरुष असल्यामुळें मनाशीं ह्मणला—अं, हे येथून निघत नाहींत, तोंवर महाराणा राजसिंहाचा पत्ता लावून घेऊं! असें ह्मणून त्यानें शहरांतील एका मनुष्यास कांहीं बक्षिस देऊन दिल्लीचा रस्ता विचारून घेतला. व त्या रस्त्यानें शहराचे बाहेर येऊन चोहोंकडे लक्षपूर्वक पहूं लागला. रजपूत दिल्लीच्या रस्त्यावर इकडे तिकडे छपून बसले असतील असा त्याचा अंदाज होता, ह्मणून तो इकडे तिकडे पहात चालला होता. पण बरेंच दूरपर्यंत कांहींच दिसलें नाहीं

पुढें एक अरुंद रस्ता दिसला त्याचे दोहोंबाजूस दोन कोसपर्यंत डोंगरानीं भली उंचउंच रांग होती. तिचे कित्येक कडे रस्त्यावर आतां कोसळून पडतील कीं काय असे पुढें आलेले होते व डावीकडची पहाडी अंमळ ठेंगणी असल्यामुळें तीवर चढण्याची सोय होती. बाकी जिकडे तिकडे मोठमोठे उंच धोंडे व कांटेरी झाडें पसरलीं होतीं. ह्या ठिकाणीं वर सांगितलेला एक अरुंद रस्ता एका बागद्यांतून गेला होता. सरांश, ह्या ठिकाणीं रस्ता फारच अरुंद होता. लुटालुट करणारे अनेक राजे होऊन गेले त्यांच्या सत्तेमुळें त्यांना कोणी लुटारू म्हटलें नाहीं आणि ह्याच माणिकलालाला आम्हीं लुटारू असें चटकर म्हटलें! नाहीतर याच्या बुद्धिमत्तेत आणि एखाद्या सेनापतीच्या बुद्धिमत्तेत कांहीं फरक नव्हता! वरील अडचणीचा रस्ता पाहून त्याचा पक्का निश्चय झाला कीं जर महाराज राजसिंह ह्या रस्त्यानें आले असतील, तर ह्या ठिकाणीं अवश्य छपून बसले असावेत! बादशहाची फौज ह्या रस्त्यानें जाणार, तेव्हां तिजवर हल्ला करण्याला येथें मोठीच सोय आहे. कारण, ह्या डाव्या बाजूच्या पर्वताचा पायथा

ठेंगणा असल्यामुळें त्यावरून मुसलमानांवर रजपूत वज्रासारखे तुटून पडतील! तशीच ही दक्षिणेकडील ह्मणजे उजव्या बाजूची टेंकडी फार उंच असून तिचे कडे तुटलेले आहेत, ह्यामुळें तिजवर चढण्या उतरण्याची फार अडचण आहे, ह्मणून मला वाटतें कीं, रजपुत लोक कधींही ह्या टेंकडीवर छपायाचे नाहींत!! डाव्या बाजूच्या टेंकडीवरच महाराणा राजसिंह असावेत. असा विचार करून त्या डाव्या बाजूच्या टेकडीवर माणिकलाल चढला. ह्यावेळेस सूर्य अस्ताचलास जाऊन संध्याकाळ झाला होता, यामुळें त्याला कोणीच दिसले नाहीं. माणिकलाल ह्मणाला, शोध तर लाविला पाहिजे, पण शोध करायाला पुढें जावें कसें? महाराण्याशिवाय दुसऱ्याची मला ओळख नसल्यामुळें मला मोंगलाचा दूत समजून रजपूत माझे तुकडे तर करणार नाहींत? याकरितां पुढें जाऊं नये, हेंच बरें. असें ह्मणून तेथेंच उभा राहून त्यानें "महाराणाकी जय" असें एकदां ह्मटलें. हा अनोळखी शब्द ऐकतांच चारपांच शस्त्रधारी पुरुष माणिकलालला 'आतां कापून टाकूं' ह्या इराद्यानें आले. पण जवळ येतांच त्यांतील एकानें ह्मटलें;

"हं, खबरदार, मारूं नका." माणिकलालानें लक्ष्य- पूर्वक पाहिलें, तों तो शब्द दुसऱ्या कोणाचा नसून महाराणा राजसिंहाचा होता.

म० राजसिंह—"ह्याला मारूं नका, हा आप- लाच आहे." हे शब्द ऐकतांच कोणी कांहीं न बोलतां सर्वजण पूर्ववत आपआपल्या ठिकाणीं जाऊन लपले.

महाराणा राजसिंह माणिकलालला घेऊन एका गुप्तस्थळीं गेले व तेथें बसून माणिकलालाला तूं येथें कां आलास ? ह्मणून प्रश्न केला.

माणिक०—येणार नाहीं कसा बरें महाराज ! जेथें धनी तेथें चाकर ! तशांत आपण ह्या आणी- बाणीच्या प्रसंगात ! तेव्हां ह्या प्रसंगीं माझ्या हातून कांहीं तरी चाकरी व्हावी ह्या हेतूनें मी येथें आलों आहें. बादशहाची फौज दोन हजार आणि आपले जवळ केवळ १०० स्वार. मग माझ्यानें निश्चित बस- वेल काय ? महाराजानें मला जीवदान दिलें हें मी विसरलों नाहीं. व पुढेंही विसरणार नाहीं.

राजसिंह—पण आह्मी येथें उतरलों हें तुला कसें ठाऊक ?

माणिकलालानें सारा वृत्तांत सांगितला. तो ऐकून **राजसिंह** मोठे प्रसन्न होऊन ह्मणाले "शाबास माणिकलाल! मला अशा चतुर माणसाची गरजच आहे; बरें झालें, तूं आलास! बरें, एक काम सांगूं? करशील का?

**माणिकलाल**—होय महाराज, मनुष्याच्यानें होणारें कोणतेंही काम करीन.

**राजसिंह**—हें पहा, आपल्याजवळ केवळ शंभर लोक. आणि शत्रूंची संख्या तर दोन हजार! त्यांच्याशीं लढून आह्मी आपला प्राण जरी गमाविला, तरी जयलाभ होणें अशक्य. अशा स्थितींत राजकन्येची सुटका होणार नाहीं, ह्मणून तिचें रक्षण होईल असें तरी प्रथम केलें पाहिजे. मग युद्ध तर आहेच. ती जर येथेंच राहिली, तर कदाचित जखमबिखम लागण्याचा संभव आहे ह्मणून तिला वांचवावयाची तजवीज केली पाहिजे.

**माणिक०**—मी एक क्षुद्र जीव! हें कारस्थान काय समजणार? माझ्या योग्य कांहीं काम सांगा.

म० राजसिंह–उद्यां तूं मुसलमानाचा वेष घेऊन शत्रूच्या सेनेबरोबर रस्त्यानें राजकुमारीच्या पालखीच्या जवळ जवळ मात्र रहा. पुढें आह्मी आपलें काय कर्तव्य करणार, तें तूं जाणतोच आहेस असें ह्मणून राजसिंहानें आपला सारा बेत त्याला कळविला. तो ऐकून माणिकलाल ह्मणाला, आपली आज्ञा शिरसा वंद्य आहे. कृपा करून एक घोडा मात्र द्यावा.

राजसिंह–माणिकलाल, शंभर स्वारांचे बरोबर शंभरच घोडे आहेत. पाहिजे असल्यास माझा घोडा मी देण्यास तयार आहें.

माणिकलाल–जिवांत जीव आहे तोंवर तर ही गोष्ट होणार नाहीं. जाऊं द्या. पुढें पाहतां येईल. पण एखादी तरवार तरी ?

राजसिंह–ती तरी कुठून येईल ? ऐन प्रसंगीं कोणाजवळून शस्त्र घेऊन कोणाला निःशस्त्र करूं ? पाहिजे असल्यास ही माझीच कालीका घे.

माणिकलाल–बरें तेंही राहिलें. वस्त्रें तरी द्या,

राजसिंह–वस्त्रें तरी हीं माझींच आहेत.

माणिकलाल—बरें तर आतां आज्ञा असावी. आपल्या आशिर्वादानें सारें पैदा करून घेईन.

म० राजसिंह हंसून ह्मणाले, कसें पैदा करणार? चोरी करणार कीं काय?

माणिकलाल—छे, छे, महाराज, आतां चोरी कशी करणार? त्याबद्दल तर मीं शपथ वाहिली आहे.

राजसिंह—तर मग काय करशील?

माणिक०—करणार काय? एखाद्यास ठकवून सारें मिळवून घेईन!!

राजसिंह हें ऐकून हंसले व ह्मणूं लागले हा युद्धाचा प्रसंग, ह्या वेळीं सारेच चोर व ठक आहेत. आह्मी तरी बादशहाच्या भावी बेगमेला हरण करण्यासाठींच आलों कीं नाहीं! पहाना, कसे चोराप्रमाणें येथें लपलों आहोंत! संधि साधून तूंही आमच्या ह्या रीतीचें अवलंबन कर.

माणिकलाल हें ऐकून मोठा आनंदित झाला व राजास प्रमाण करून उठून उभा राहिला.

---

# भाग बारावा.

## रूपनगरची तांबोळीण व मियाजी

माणिकलाल पुनः रूपनगरास आला. ह्यावेळीं सायंकाळ झाला असल्यामुळें जिकडे तिकडे दिव्यांचा चकचकाट होता! शहरांतील बाजार तर ह्यावेळीं मोठा मजेदार दिसत होता. जिकडे तिकडे प्रकाशच प्रकाश. नानाप्रकारच्या मेवामिठाईचीं तार्टे हौसी व विलासी लोक रिकामी करीत होते. चित्रविचित्र फुलांचे हार गजरे नेत्रांनां सुख व घ्राणेंद्रियांना तृप्ति देत होते. माणिकलालला अगोदर कोणाजवळून तरी शस्त्र, व घोडा लुबाडावयाचा होता, तरी पोटाची व्यवस्था लावण्यासाठीं त्यानें आळस केला नाहीं. त्यानें कांहीं मिठाई घेऊन आपला फराळ आटपला व पाणी पिऊन तो विड्याच्या शोधार्थ फिरूं लागला. थोड्याच अंतरावर एका तांबोळणीचें खूब सजलेलें दुकान त्याला दिसलें. त्या दुकानांत जिकडे तिकडे प्रकाश लखलख, भिंतीला छानदार रंग व तसबिरीही बऱ्याच होत्या, मध्यभागीं एका सुंदरशा

गालिच्यावर दुकानाची मालकिण (तांबोळीण) सरासरी तिसेक वर्षांच्या वयाची, रंग गोरागोरापान, डोळे पाणीदार आणि मोठे, मधूर बोलणारी, क्षणोक्षणी हरएक गोष्टींत हंसणारी. अशी बसली होती. तिच्या अंगावर दागिनेही बरेच होते, त्यांतले कांहीं सोन्याचे होते व कांहीं पितळेचे होते. पितळेचे होते, पण होते मात्र सुरेख! माणिकलालनें तिजकडे विडे मागितले. तेव्हां तिनें आपल्या समोर बसलेल्या एका पोरीस ते त्याला देण्यास सांगितलें. तांबोळीण स्वतः विडे देत नव्हती. त्या मुलीकडून देत असे. तिचें काम एवढेंच कीं मंदहास्यकरून विड्यांची किंमत घ्यावी. ह्याप्रमाणें माणिकलालला त्या पोरीनें विडे करून दिले व त्या तांबोळणीच्या हातावर दुप्पट पैसे ठेवून तिजकडे एक विडा आणखी मागितला. ती पोर विडा करीत आहे, इतक्यांत माणिकलालनें तांबोळीणीशीं बोलतां बोलतां दोनचार हांशाच्या गोष्टी दिल्या सोडून! तांबोळीणही रंगप्रियाच होती. तिनेंही आपल्या विड्याप्रमाणें स्वादिष्ट गप्पांचा विक्रय मांडिला! माणिकलाल दुकानावर जाऊन बसला व त्यानें तेथें पडलेला हुक्का

पिण्यास व विडे खाण्यास सुरुवात केली. विडे इतके खाल्ले कीं, तांबोळीणीच्या दुकानांत विड्याचा मसाला सुद्धां राहिला नाहीं! तो आणावयासाठीं विडे करणारी पोरगी दुसऱ्या दुकानांत गेली, तेव्हां **माणिकलालानें** तांबोळीणीशी बोलण्यास सुरुवात केली.

**माणिकलाल**—तुमची चतुरता पाहून मला तर खरोखर मोठा आनंद झाला आहे! आमच्या एका वैऱ्याला ठकवावयाचें आहे; त्यांत तुह्मीं मदत द्याल, तर तुह्मांला एक मोहर देईन.

**तांबोळीण**—मदत कसली? सांगा.

माणिकलालानें हळूं हळूं सारें कांहीं तिला समजावून दिलें.

तांबोळीन छटेलच होती, तिला मोठा आनंद होऊन ती ह्मणाली, मोहरबिर मला नको. ही एक मजाच उडेल, हेंच तर मोठें इनाम आहे!!

नंतर **माणिकलालानें** दऊत लेखणी व कागद घेऊन तांबोळीणीच्या सल्लचानें खालील पत्र लिहिलें.

जानेमन सलामत्.

आपका शहर की सैरके लिये तशरिफ लाना

बंदीके हकमें गजब होगया! जबसे तुह्मने देखा है, तबसे, कसम खुदावंत करीमकी कि दिल काबूमें नहीं रहा–अगर आपन मिले, तो जीनें की उम्मैद नहीं है. लेकिन सुनती हूं कि कल आप रुखसत् हो जायेंगे. इसते अर्ज है कि आज किसी तरह जरूर मिहिरबानी फरमाईये. नहीं तो मैं अपने गर्दनपर छूरी फेर, लूंगी! लिहाजा कासिदके साथ कदमरंजा फरमाईये, तो मकानका रास्ताभी न तलाश करना पडेगा. "

येणेप्रमाणें पत्र लिहून त्याची घडी केली. व त्यावर " महंमदखां " अशीं अक्षरें लिहिलीं, तें पाहून–तांबोळीन ह्मणते, हा महंमदखां कोण बरं?

माणिकलाल–" मोंगलांच्या सेनेंत एक स्वार आहे. " वास्तविक पाहिलें तर माणिकलाल मोंगलाच्या लष्करांत कोणालाही ओळखत नाहीं! पण तो महाचतूर. त्यानें विचार केला कीं, ज्या लष्करांत दोन हजार मोंगललोक आहेत, तेथें " महंमदखां " या नांवाचा इसम कोणी असेलच असेल! ह्या विचारानें त्यानें पत्र बंद केलें आणि तांबोळिणीला पुन्हां एकदां " ह्याच ठिकाणीं आणूं कां? " ह्मणून विचारिलें. ती ह्मणाली.

" छे, इथें कांहीं ठीक जमायचं नाहीं, दुसरं घर माड्यानं घेतलं पाहिजे. " ह्याप्रमाणें दोघांचा विचार ठरून एक घर भाड्यानें घेतलें व आपल्या भावी पाहुण्याचा ( शत्रूचा ) नीट मानपान होऊन, त्याच्या ऐशआरामांत कमतरता येऊं नये ह्मणून तें खूब सजविलें व माणिकलाल मोंगलाच्या लष्करांत गेला. तेथें कोणाचा हुकूम कोणावर नाहीं, सर्व मनाचे राजे, जिकडे तिकडे नाचरंग, गाणेंबजावणें चाललें आहे, असा प्रकार दृष्टीस पडला. माणिकलालानें एका मुसलमानाला विचारिलें " महंमदखां कोई साहब है?" त्यानें उत्तरच दिलें नाहीं. दुसऱ्या कित्येकांना विचारिलें, तेव्हां त्यांतून कित्येकांनीं त्याला शिव्या दिल्या, कित्येकांनीं ठाऊक नाहीं ह्मटलें व कित्येक ह्मणाले, " दुसरीकडे शोध कर- " असें होतां होतां, एका मुसलमानाला माणिकलालानें तोच प्रश्न केला, तेव्हां तो ह्मणाला; " हम उनसे तो वाकिफ नहीं है, हां हमारा नाम नूर महंमद है. हमारे लायक काम हो, तो बतलाइये, "

माणिकलाल–उनके नामका एक खत लाया हूं.

मुसलमान—देखें, हमारा न हो!

माणिकलाल त्याला पत्र देऊन मनांत ह्मणाला, काम तर झालें! मुसलमान स्वार पत्र वाचून मनांत फार खुष झाला. तो मनांत ह्मणाला, पत्र कोणाचेंही कां असेना, पण एका मापुकाच्या भेटीचा योग तर खूब आला! यांत चुकणें ह्मणजे हातचेंरत्न गमाविणें होय!! असें ह्मणून "खत हमाराही है, ठहरो, हम तुझारे साथही चलते हैं." असें माणिकलालला सांगून तो तंबूंत गेला. मुसलमानांची बाहेरची टापटीप प्रसिद्धच आहे! त्याप्रमाणें केंस-बीस विंचरून, मारे जामानिमा चढवून स्वारी अत्तर लावीत बाहेर येऊन माणिकलालाला विचारूं लागली कीं, "क्योंजी मकान यहांसें कितनी दूर है?" माणिकलालानें हात जोडून मोठ्या मर्यादेनें उत्तर दिलें; "हुजूर, है तो जरा दूर. घोडेपर चलियेगा तो बेहतर होगा."

खांसाहेब "बहोत अच्छा" ह्मणून घोड्यावर स्वार होऊन निघाले. तितक्यांत माणिकलाल हात जोडून पुन्हां ह्मणाला—"हुजूर, बडे घरकी बात ठहरी, हथियार ले चलियेगा तो अच्छा होगा." नूतन रंगे-

त्यानें मनाशीं विचार केला कीं खरेंच, रिकाम्या हातीं जाणें बरें नव्हे. तशांत आमच्यासारख्या जंगी शूर बहाद्दरानें तर कधींच जाऊं नये. असें ह्मणून शस्त्रही बरोबर घेतलें आणि घोड्यास इशारा केला.

दोघेही नेमलेल्या ठिकाणाजवळ आले, तेव्हां माणिकलाल ह्मणाला, " हुजूर, घोडा आगे न जा सकेगा. मिहिरबानी करके उतर पडिये. मैं इसे थामे रहुंगा. आप जाईये. देखिये वह घर है. "

खांसाहेब घोड्यावरून उतरले व माणिकलालनें घोडा धरून ठेविला. आतां खानबहादूर घरांत जाणार, तोंच त्यांना वाटलें कीं, माशुकाच्या भेटीस शस्त्रासहित जाण्याची काय जरूर! ह्मणून पुन्हां परत येऊन **माणिकलालच्या** स्वाधीन शस्त्रही केलें! झालें! माणिकलाल नेत्र पहात होता!!

**माणिकलालानें** दाखविलेल्या घरीं खांसाहेबांनीं प्रवेश केला. तेथें जिकडे तिकडे तसबिरा लाविल्या होत्या, हंड्याझुंबरांची गर्दी उम्तळली होती, फुलांचे हार, गुच्छ व नानाप्रकारचीं अत्तरें यांचा घमघमाट सुटला होता. बाजूसच एक पलंग पडला होता व

त्यावर एक सुंदर तरुणी मियाजींची वाट पहात बसली होती. हा सारा थाट पाहून मियाजी तर जिवंतच स्वर्गास पोंचले! चटकन जोडा काढून पलंगावर जाऊन बसले व त्या तरुणीशीं चार सलगीच्या गोष्टी झाल्या-वर, आंगांतले कपडे काढून जवळच पडलेल्या फुलाच्या पंख्यानें वारा घेत, तेथें असलेला हुक्का गुड-गुडावयास लागले. त्या तरुणीनेंही चार चित्ताकर्षक व स्नेहमय गोष्टींत मियाजींचें मन, हरण करण्यास कमी केलें नाहीं!

मियासाहेब अशा आनंदांत असतां माणिकलाल बाहेरील दाराशीं येऊन कपाट खडखडावूं लागला. तेव्हां आंतून ती सुंदरी बोलली " कोण आहे? " माणिक-लाल कृत्रिम स्वरानें ह्मणाला, " घरघनी. " हे ऐकतांच ती चतुर स्त्री भयभित झाल्यासारखें दाखवून ह्मणाली— " अग बाई! आतां कसं होईल? घरीं येणं झालं आहे! "

मियासाहेब—फिर अब क्या करना चाहिये?

तरुणी—तुह्मी थोडावेळ ह्या पलंगाखालीं लपून बसा. आतां वाटेस लावतें.

मियासा०-वाह! मर्दबच्चे होकर चोरके तरह छिपिंगे? आनेदो, अभी काटके रख दूं तो सही!

तरुणी अमळ चरकल्यासारखी होऊन ह्मणाली, " अगबाई! असं मात्र करूं नका. ते शिरावर आहेत ह्मणून तर मला कोणी बोलत नाहीं?"

मियासाहे०-फिर बताओ न! क्या करूं?

तरुणी-करायचं काय? अमळ लपले तर कांहीं हरकत आहे? आतां कोणत्याही निमित्यानें बाहेर काढतें.

इतकें भाषण होत आहे, तितक्यांतच माणिकलालनें दहापांच हांका मारिल्या व त्यामुळें बिचाऱ्या मियासाहेबाला पलंगाखालीं दडावें लागलें!

मियासाहेबाचा देह स्थूळ, यामुळें त्या लहानशा पलंगाखालीं त्याची मोठी दुर्दशा झाली! पण करणार काय? प्रेमासाठीं सारेंच कांहीं सहन करावें लागतें! असो; हा स्थूळ मांसपिंड पलंगाखालीं लपल्यावर तरुणीनें दार उघडिलें आणि **माणिकलाल** आंत आले. तेव्हां त्या तरुणीनें पूर्व संकेताप्रमाणें त्याला विचारिलें, आज तुह्मीं येणार नव्हतांना?"

**माणिकलाल**—" काय करूं किल्ल्याचें जुडगेंच विसरलों ! "

असें ह्मणून किल्लच्या शोधण्याचे निमित्यानें मिया-साहेबाचीं वस्त्रे गुंडाळून दोघेंही बाहेर आलीं व दारास कुलूप लाविलें. आंत मियासाहेब पलंगाखाली उंदराच्या दांताचे आघात सहन करून सुंदरीची मार्गप्रतिक्षा करीत पडले होते ! त्यांना ह्याप्रमाणें पिंजऱ्यांत बंदकरून आमचे धूर्तशिरोणि माणिकलाल व त्याची नवीन रसिका ह्यांनीं तेथून पोबारा केला !

**माणिकलालला** जें इष्ट होतें तें सारें मिळालें ! त्यानें तो मियासाहेबांचा मुसलमानी पोषाख चढवून, कंबरेस तीं हत्यारें बांधिलीं व त्या आयत्याच मिळालेल्या लढाऊ खंद्याघोड्यावर स्वार होऊन सुंदरीचा निरोप घेत मुसलमानांच्या छावणीचा मार्ग धरिला.

---

## भाग तेरावा.

---

### प्रयाण.

नेमलेल्या दिवशीं मुसलनांची फौज तयार होऊन

चंचलकुमारीला नेण्यासाठीं रूपनगरच्या राजवाड्यासमोर जमली. चंचलकुमारीनें स्नानकरून रत्नजडित दागिनें घातले. निर्मलाही तेथेंच होती. तिनें राजकन्येस वस्त्रालंकार लेवविले, तेव्हां राजकन्या तिला ह्मणाली-" सखे, निर्मले, ही मी चितेवर बसण्यास चाललें आहें; तेव्हां मला आगखी एक पुष्पमाला आपल्या हातानें घाल पाहूं! "

ह्या तिच्या उदास भाषणानें निर्मलेला तर रडें कोसळलें, पण तें दाबून ती ह्मणाली, " सखे, असं काय बरं? तूं तर उदेपुरची महाराणी व्हावयास चालली आहेस. " असें ह्मणून निर्मलेनें तिच्या गळ्यांत पुष्पमाला घातली. पुष्पमाला तिच्या गळ्यांत पाहून तिला काय वाटलें ते नकळे, पण एकदम तिला रडण्याचा जो हुंदका आला, तो कांहीं केल्या आवरेना. चंचलकुमारीलाही वाईट वाटून रडें कोसळलें. दोघीही एकमेकींना धरून रडूं लागल्या. ह्याप्रमाणें कांहीं वेळ गेल्यावर राजकन्या चंचलकुमारी ह्मणाली-" निर्मले, ह्यापुढें आतां मी तुला कसची भेटतें? हें रूपनगर तरी मला पुन्हा कसं दिसणार! हाय!! हाय!!! "

निर्मला-सखे, अशी अधीर होऊं नकोस. तूं कुठं जरी असलीस तरी मी तुला भेटेन. अग आपण एक-मेकींना भेटल्यावांचून आपले प्राण तरी कसे वांचतील?

राजकन्या-हें बाई कुणी सांगावं? मी तर दिल्लीच्या रस्त्यावरच स्वर्गाचा मार्ग पाहीन!

निर्मला-पण त्याच्याही अगोदर मी तुला दिल्लीच्या रस्त्यावर भेटेन समजलीस?

राजकन्या-गडे, हें कसं बरं घडून येईल?

निर्मला कांहीं न बोलतां रडूं लागली. तिला समाधानाच्या गोष्टी सांगत राजकन्या चंचलकुमारी देवदर्शनासाठीं जवळच्या शिवमंदिरांत निघून गेली. श्री पशुपतीची पूजा झाल्यावर ती सद्गदीत अंतःकरणानें प्रार्थना करूं लागली कीं, "हे पार्वतीनाथ, ही तुझी दीन कन्या आज मरायाला जाते आहे. देवा, हिजसारख्या दीन मुलीचा बळी घेतल्याशिवाय सृष्टीचें रहाटगाडगें चालविणें तुला कठीण पडलें होतें काय? देवाधिदेवा, असेंच जर तुझ्या मनांत होतें, तर मग ह्या राजकुळांत तरी मला कशाला जन्म दिलास? असो, तुझी इच्छा!!"

ह्याप्रमाणें स्तुति झाल्यावर ती तेथून महालांत आली व आपल्या आईबापांची भेट घेऊन तिनें आपल्या साऱ्या दासींना बक्षिसें दिलीं आणि साऱ्यांचें समाधान करून त्यांचा अखेरचा निरोप घेत पालखींत बसावयाला चालली. मार्गेपुढें दोन हजार फौज नियमित व्यवस्थेनें उभी आहे, जवळच चोपदार भालदार दिल्लीश्वराची बढेजावी गात आहेत, अशा त्या रत्नखचित् पालखींत चंचलकुमारी बसली व चोहोंकडून फुलांचा वर्षाव होऊं लागला, तोंच सेनापतीनें कुच करावयाची आज्ञा केली. तुडुंब भरलेल्या सरोवराचा पाट फुटला ह्मणजे जसा तो अखंड वेगानें धांवतो, त्याप्रमाणें दिल्लीच्या मार्गानें लगाम चवळीत ऐटीनें चाललेल्या घोड्यांची रांग लागली. त्यांच्या खिंकाळण्यानें सारा प्रदेश गजबजून गेला. ही वेळ पहांटेची असल्यामुळें मंद मंद वाराही वहात होता. त्यामुळें एका व्यक्तीशिवाय करून साऱ्यांचीं मनें उल्हासित होतीं. स्वारांपैकीं कित्येक गात चालले होते, त्यांपैकीं चंचलकुमारीच्या पालखी जवळच्या एका स्वारानें हा गजल ह्मटला.

* " हम जिन्हे दूर समझतेथे, वह अजबस है करीब ।
बाद मरनेके भी आफत से बचाने वाले । "

स्वाराच्या ह्या गाण्यानें चंचलकुमारीला राजसिंहाची आठवण झाली. जणु काय तें गाणें चिंतित् वस्तूची आठवण करून देणारा महामंत्रच होता! बिचाऱ्या चंचकुमारीला हें काय ठाऊक कीं, राजसिंहाचा विश्वासू सेवक माणिकलाल मुसलमान वेषानें आपल्या पालखीजवळ आहे ! !



## भाग चवदावा.

—:○:—

### निर्मला.

राजकन्या चंचलकुमारी पालखींत बसल्यावर मागें पुढें दोन हजार मुसलमान स्वार, अल्लामियाच्या स्तुतीनें पहाड गर्जवीत चालले होते, पण मागें बिचारी, निर्मला राजकन्येवांचून चैन न पडल्यामुळें गच्चीवरून जेथपर्यंत

---

* छायार्थ—( गजल ) दूर ज्या समजून तूं होशी अधिर अशी । दूत त्याचा तो जवळ हा, ठाउकें का हें तुशी ॥

दृष्टीचा पल्ला पोंचेल, तेथपर्यंत तरी आपल्या सखीला पहावें ह्मणून दिल्लीच्या वाटेकडे टक लावून पहात होती. जेव्हां दृष्टीच्या पल्ल्यांतून सारे लोक गेले. कांहीं दिसेना; तेव्हां निर्मला माडीवरून खालीं उतरली व तिनें एका कोपऱ्यांत पडलेलीं एका दासीचीं जुनीं वस्त्रें घेऊन त्याबद्दल आपलीं नवीं वस्त्रें तेथें ठेवून दिलीं, अंगावरील दागिनेही काढून ठेविले व तीं जीर्ण वस्त्रें नेसून जवळ असलेले कांहीं रुपये बरोबर घेतले. ह्याप्रमाणें तयारी करून कोणाला न कळत निर्मला रूपनगराहून दिल्लीकडे जावयास निघाली.

---

## भाग पंधरावा.

### पाषाणवृष्टि.

ज्या ठिकाणीं माणिकलाल व राजसिंह यांचीभेट झाली होती, त्या पहाडाच्या बिकट भागावर मुसलमानांचें लष्कर पोंचलें. प्रचंड सर्पानें जसा बिळांत प्रवेश करावा, तद्वत मुसलमानी सैन्य त्या पहाडामधील अरुंद

रस्त्यानें प्रवेश करूं लागलें. घोड्यांच्या टापांचा व त्यांच्या खिंकाळण्याचा जो ध्वनि होत होता, त्यांतच आणखी शस्त्रांचा मधून मधून होणारा खणखणाट व लोकांचा आपसांतला गप्पागोंधळ साह्य झाल्यामुळें ह्या वेळीं त्या पर्वताचा पायथा गुंजून राहिला होता. रस्त्यावरील झाडांमधून जे पक्षी एका क्षणापूर्वी आनंदक्रीडेंत निमग्न होते, ते आतां सैरावैरा उडून, आपला जीव कसा तरी ह्या सर्वभक्षी यवन धाडींतून वांचवीत होते. ह्याप्रमाणें गजबजून गेलेल्या पहाडांमधून बहुतेक सारे स्वार त्या दोन्ही पहाडामधील मागें सांगितलेल्या संकुचित रस्त्यावर पोंचल्याबरोबर त्यांच्यांत एकच गडबड उडाली! एकाएकीं भयंकर शब्द होऊन आसपासचे योद्धे तटस्थपणें जेथल्या तेथेंच उभे राहिले व हा काय चमत्कार आहे तो पहावा, ह्मणून बाजूच्या पर्वत शिखराकडे पाहूं लागले, तेव्हां असें आढळून आलें कीं, ह्याच पर्वतशिखरावरून एक भयंकर शिळा कडंडत येऊन तिच्याखालीं एक स्वार दबला आहे व दुसरा उठून बसण्याच्या उपयोगीं नाहीं!! हा काय चमत्कार आहे, ह्याचा कोणासच तर्क होईना! इतक्यां-

तच दुसरी एक भयंकर शिळा आली!! याप्रमाणें पहातां पहातां एक दोन नव्हे, शेंकडो शिळा येऊन त्याखालीं घोड्यासहीत स्वार दबून मरूं लागले! घायाळही बरेच झाले. सारांश, थोड्याच वेळांत तो संकुचित मार्ग अगदीं बुजून गेला. राहिलेले स्वार आपापल्या जिवाच्या आशेनें सैरावैरा पळूं लागले. घोडेही बिचारे स्वारांच्या लगामास न जुमानितां वाटेल तिकडे धांवण्याची संधि पाहूं लागले. अशी एकच गडबड उडाली. अशा संधीस माणिकलाल पालखीच्या वाहकांना (भोयांना) ह्मणाला—" घाबरूं नका, डावीकडील रस्त्यानें चला.

जेथें माणिकलालचा घोडा व राजकन्येची पालखी होती. त्याच्या जवळच ही वरील गडबड झाली होती. यामुळें भोई, बिचारे आपला जीव ह्या प्रसंगांतून कसा वांचेल ह्या चिंतेंत होते. तशांतच घोड्यांनीं तर मार्गे सरून सरून त्यांना तुडवावयाचा हेकाच धरिला होता! ह्मणून, माणिकलालनें त्यांना सांगतांच ते त्या रस्त्याकडे वळले.

हा रस्ता हल्लींच्या रस्त्याच्या बाजूनें निघाला असून " त्यातून फक्त एकेक स्वार जाऊं शकेल इतका तो

रुंद होता, " हें पूर्वी सांगितलेलें वाचकांस आठवतच असेल. ह्या वेळीं ह्या अरुंद बोळाप्रमाणें मासणाऱ्या रस्त्यावर पालखी पोंचली होती व तेथेंच वर सांगितलेली गडबड उडाली होती. ह्या गडबडाध्याय नाटकाचे सूत्रधार आमचे कथानायक राजसिंह होते, हें वाचकांना आह्मीं स्पष्ट सांगितल्यावांचूनच ते समजतील. माणिकलालनें भयभित झालेल्या भोयांना " स्वप्राण रक्षणासाठीं ह्या मार्गानें व्हा " ह्मणतांच ते आपला व राजकन्येचा जीव वांचविण्याकरितां त्या अरुंद मार्गानें जाऊं लागले. मागें माणिकलाल होताच. आसपासच्या घोडेस्वारांना ह्या अरुंद बोळाखेरीज दुसरा स्वप्राण रक्षणाचा मार्गच दिसेना, ह्मणून त्यांनींही तिकडेच आपले घोडे हांकण्याचा निश्चय केला. एका मुसलमान स्वारानें माणिकलालच्या मागेंच आपला घोडा त्या रस्त्यावर आणला, तोंच जवळच्या डोंगरावरून एक मद्रा पचंड दगड कलंडत कलंडत आसपासच्या प्रदेशास दणाणवीत त्या स्वाराचे अंगावरच नेमका येऊन पडला!! स्वार घोड्यासुद्धां चेंगरून, होता कीं नव्हता अशी त्याची स्थिति झाली व रस्ता बंद झाला! जणुं-

काय हा काळंडत येऊन पडलेला दगड तेथें " खबरदार पुढें पाय ठेवूं नका " ह्मणून मुसलमानांला मज्जाव करण्याकरितां द्वारपालच झाला कीं काय हें नकळे! हा दगड उल्लंघन करून पलिकडे जावयाची कोणाची प्राज्ञा नव्हती. यामुळें एकटा माणिकलालच पालखीच्या मागें चालला होता. व मागचे मुसलमान मागेंच राहिले होते. त्यांपैकीं जे अगदीं जवळ होते, त्यांनीं वरील भयंकर प्रकार पाहून आपला पाय मागें घेतला.

मागें सांगितलेंच आहे कीं ' ह्या पर्वताचा दक्षिण भाग अतिशय उंच असून त्यावर चढणें महाप्रयासाचें आणि साहसाचें काम आहे. ह्या पर्वताचा एक कडा वरील अरुंद रस्त्यावरच आला होता आणि त्यायोगानें हा रस्ता केवळ अंधःकारमय झाला होता. रजपूत लोकांनीं ह्या अंधाऱ्या भागाची चांगली माहिती करून घेऊन, ते ह्या वेळीं पर्वताच्या वरील भागावर चाळीस पन्नास हाताच्या अंतरानें बसले होते. सरासरी ५० रजपूत होते व प्रत्येकाजवळ दगडांची एकेक रास होती! मुसलमान जवळ आलेले पाहून सर्वांनीं एकदम प्रचंड शिळा ढकलण्यास आरंभ केला व पाहिल्याच

घडाक्यांत त्यांनीं पन्नास स्वार, त्यांच्या घोड्यांसहित स्वर्गसुख घेण्यास पाठवून दिले! हा प्रचंड दगडांचा वर्षाव कोण करीत आहे, हें कोणाच्याच दृष्टीस पडत नव्हतें. आणि कदाचित् पडलेंही असतें, तर ह्या एवढ्या उंच पर्वतशिखरावर बसलेल्यांचें कोणी काय केलें असतें? ह्मणूनच सारे मुसलमान निरुपायानें मागल्यापायीं पळत सुटले.

ही लीला केवळ पन्नास रजपुतांची होती! बाकीचे पन्नास महाराणा राजसिंहासह डावे बाजूकडील ( उत्तरेच्या ) टेंकडीवर हा वेळ पावेतों स्वस्थ बसले होते. पण त्यांनींही आतां उचित समय जाणून आपल्या उद्योगास आरंभ केला होता. ज्या ठिकाणीं हा भयंकर दगडांचा वर्षाव होत होता, त्या ठिकाणीं मिरजा-मुबारक अली नांवाचा तरुण सेनापति दोनशें सरदारांसहित उभा होता. त्याचा विचार सरळ मार्गानें जावयाचा होता व त्याप्रमाणें त्यानें आपल्या सैन्याची व्यवस्था केली होती. पण जेव्हां राजकन्या चंचलकुमारी हिची पालखी मार्गें सांगितलेल्या अरुंद रस्त्यानें एका स्वारासहित गेली व लागलीच एक प्रचंड शिळा येऊन तो

रस्ता बंद झाला असें त्यानें पाहिलें, तेव्हां त्याचें मन भयचकित् होऊन त्याला असें वाटूं लागलें कीं, राज-कन्येस हरण करून न्यावयासाठीं तर हें कपट कोणी केलें नसेल? ही शंका त्याचे मनांत येतांच त्यानें आपल्या स्वारास आज्ञा केली कीं, "बाबांनो, जीव गेला तर बेहेत्तर; पण शंभरजण त्या पालखीबरोबर चला. अशा वेळीं घोडे कांहीं उपयोगाचे नाहींत. उतरा त्यांचेखालीं, आणि त्या रस्त्यावर पडलेल्या दग-डावर चढा! मी देखील तुमचे बरोबर येतों." असें ह्मणून तो घोड्यावरून उतरला आणि ती प्रचंड शिळा चढून जाऊन क्षणाधांत तिच्या पलिकडे झाला. त्याच्या लागोपाठ शंभर मुसलमान स्वारांनींही त्याचें अनुकरण केलें. महाराणा राजसिंह ही सर्व धालमेल पर्वतावरून पहात होते. जोंवर मुसलमानांचें चढणें उतरणें चाललें होतें, तोंवर राजसिंह आणि त्यांचे अनुयायी स्वस्थ बसले होते. पण जेव्हां ते सर्व स्वार तो दगड उल्लं-घून त्या अरुंद रस्त्यावर पसरले, तेव्हां राजसिंह आपल्या पन्नास लोकांसह एकदम त्यांच्यावर तुटून पडून, त्यांतील एकेकास स्वर्गाची वाट दाखवूं लागला.

असा जयध्वनि केला ! तो त्यांचा उत्साह आणि वीरश्री पाहून राजसिंहास पक्केपणीं वाटलें कीं, जय अपजय अथवा तारण मारण ईश्वराधीन आहे, पण हे माझे राजपूत मागें हटणारे नव्हत. नंतर दोन दोन राजपुतांची एक एक रांग; अशा रांगा करून महाराज राजसिंह सर्वांच्या पुढें झाले. हे लोक थोडे दूर गेले नाहींत, तोंच एकाएकीं पर्वतावरील रस्त्याकडून सारा प्रदेश कांपवून सोडणारा "माता की जय" असा रणकर्कश शब्द ऐकूं आला. हा आनंददायक ध्वनि ऐकून राजपूत लोक सानंदाश्चर्यानें तिकडे पाहूं लागले तों दोहों बाजूंनीं नरकेसरी राजपुतांच्या रांगांनींयुक्त अशी एक सुहास्य वदना, कमललोचना तरुणी आपणाकडेसच येत आहे असें त्यांना दिसलें. ह्या मनोहारिणीला पाहून, हो राजपुतांची साह्यकर्ती काली तर हें स्त्रीरूप घेऊन आली नसेल ! असे उद्गार राजसिंहाच्या तोंडावाटे निघाले. राजपूत ह्मणूं लागले, " आमच्या संकट समयीं आमची चितुरगडनिवासिनी चतुर्भुजा माता धांवून आली यांत संशय नाहीं." याप्रमाणें त्या सौंदर्यराशीविषयीं सर्वांचीं मनें घोटाळ्यांत पडलीं-

असतां, **राजसिंहानें** तिजकडे लक्ष लागून पाहिल्यावर मनांत ह्मटलें, आहे तर ही मनुष्य जातीचीच ह्मणा, पण हें असाधारण सौन्दर्य कांहीं भलत्यासलत्याचे कुळांत उत्पन्न व्हावयाचें नाहीं! असें ह्मणून त्यांनीं आपल्या लोकांना विचारलें, 'पालखी कुठें आहे?' एका सरदारानें उत्तर दिलें "ही येथें आहे महाराज."

**राजसिंह**—आंत कोणी आहे कीं नाहीं, पहा बरें? एकानें ह्मटलें, "महाराज, तेथें राहणार कोण? राजकन्या तर आपलेसमोर उभी आहे.

त्या सरदाच्या तोंडावाटे हे शब्द निघतांच **चंचलकुमारीनें** राजसिंहास प्रणाम केला. तेव्हां तिच्याकडे पाहून महाराज राजसिंह ह्मणाले,—राजकन्ये, तूं येथें कां बरें आलीस? **चंचलकुमारी** ह्मणाली, "मी आपल्याला प्रणाम करावयास इथें आल्यें होतें, प्रणामाबरोबर आपणापाशीं आणखी एक मागणें आहे. पण तें आपण द्याल तर. महाराज मी एक अल्लड बालिका असल्यामुळें स्त्रियांस शोभविणारे लज्जा, विनयादि गुण माझ्यांत नाहींत!" शेवटचें वाक्य **चंचलकुमारी** मोठ्या नम्रतेनें बोलली. त्यावर राजसिंह ह्मणाले

छे छे, राजकन्ये, तुला जें मागावयाचें असेल तें तूं खुशाल माग. तूं मागितलेलें न देण्यासाठीं कां मी इतक्या लांब आलों?" चंचलाह्मणाली—"महाराज, मी बालबुद्धीस वश होऊन आपणाला यावयाचा निरोप पाठविला, पण मनाची लहर कांहीं विचित्र आहे. म्लेंछनाथ दिल्लीश्वराची कीर्ति ऐकल्यापासून हें मन त्याच्याकडेस वेधलें आहे. यासाठीं आपण मला दिल्लीस जावयाची आज्ञा द्यावी." महाराज राजसिंह हें ऐकून चकित होत्साते ह्मणाले "राजकन्ये, अशीच जर तुझी इच्छा असली, तर जा; मजकडून ना नाहीं. स्त्रियांचें चित्त असेंच नेहमीं अस्थिर असतें, हें मला ठाऊक आहे! पण, तुला जर आह्मी असें जाऊं दिलें, तर हे मुसलमान लोक समजतील कीं, आमच्या भीतीनें ह्यानें हिला पाठवून दिलें आहे. ह्मणून युद्ध संपेपर्यंत तेथें रहा व मग पाहिजे तर जा. तोंपर्यंत मात्र तुझें जाणें होणार नाहीं." असें ह्मणून त्यानें आपल्या शूर लोकांस पुढें चाल करण्यासाठीं हुकूम केला. तेव्हां चंचलकुमारी आडव्या नजरेनें राजसिंहाकडे पहात उजव्या हातां-तील हिऱ्याची आंगठी डाव्या हातानें काढीत ह्मणाली;

महाराज, ही पहा आंगठी. हींत विष भरलें आहे. आपण जर मला दिल्लीस जाण्याची मनाई कराल, तर हीच खाऊन मी प्राणत्याग करीन' राजसिंह हंसून ह्मणाले—वः राजकुमारिके, भली केलीस! तुझी इच्छा एकूण दिल्लीस जावयाची आहे तर! अं? पण हें पहा, आज राजपुतांना मरावयाचें आहे. ते जर मागें पाय घेतील तर कुलाला कलंक लागेल. ह्मणून जोंवर आह्मी जीवंत आहों तोंवर तूं आमच्याकडील बंदीवान आहेस मागें मग तुझी तूं मुखत्यार? समजलीस. ” चंचलकुमारी तें ऐकून सस्मित वदनानेंयुक्त असा एक कटाक्ष राजसिंहावर फेंकून मनांत ह्मणते, राजाधिराज, मी बंदीवान कशी बरें होईन? आजपासून तर मी आपली पट्टराणी झालें. आणि असें जर झालें नाहीं, तर मात्र हा देह मी कांहीं ठेवणार नाहीं! असें ह्मणून उघड रीतीनें ती राजसिंहास ह्मणाली—“महाराज, जिला दिल्लीपति आपली पत्नि करूं इच्छितात, ती कोणाची तरी बंदीवान् होऊं शकेल? ही पहा मी मोंगलाच्या सैन्यांत चाललें. पाहूं मला कोण अडविणार तें? ” असें ह्मणत ती प्रत्यक्ष रणदेवीप्रमाणें भासणारी चंचला

राजसिंहाजवळून मोंगलाच्या सैन्याकडे निघून गेली. तिला स्पर्श करून अडविण्याचें सामर्थ्य कोणासच नचल्यामुळें तिला कोणी अडविलें नाहीं. सुवर्णजडित मणिमौक्तिकानें शृंगारलेली ती चंचलादेवी प्रत्यक्ष अग्निशिखेप्रमाणें भासणाऱ्या यवनसेनेसमोर जाऊन उभी राहिली! हें पाहून सर्व मोंगल आश्चर्यांत पडले. त्यांना वाटलें, ही कोणी ह्या पहाडावर वास्तव्य करणारी वनदेवीच आहे. पण चंचलकुमारीनें पुढील प्रश्न करून त्यांचा तो भ्रम दूर केला.

**चंचलकुमारी**–ह्या फौजेचे अधिपति कोण आहेत.

**मुबारकअली** जो मागें सांगितलेल्या अरुंद रस्त्यावर तोफ लावून राजपुतांची वाट पहात होता, त्यानें **चंचलकुमारीचा** वरील प्रश्न ऐकून उत्तर दिलें–"फौज इसी गुनाहगारके मातहत है. आप फरमाईये कौन है!

**चंचल०**–मी एक साधारण अबला असून आपण ऐकत असल्यास आपणास माझी एक विनंति आहे. मात्र अंमळ एकिकडे चला.

**मुबारक०**–अच्छा है.

**असें म्हणून तीं दोघेंही जेथून त्यांचें बोलणें कोणी**

ऐकूं शकणार नाहीं, अशा ठिकाणीं गेलीं व चंच-लकुमारीनें बोलण्यास आरंभ केला. ती ह्मणाली-" मी रूपनगरच्या राजाची मुलगी असून मला नेण्याकरितांच आपणाला पाठविलं आहे. हें माझं बोलणं आपणाला खरं वाटतं कां ? "

मुबारक०-क्यों नहीं हुजूर ? आपका चेहरा ही कहे देता.

चंचल०-तर मग ऐका. मला आपला धर्म अतिशय प्रिय असल्यामुळें मोंगल बादशाहाशीं लग्न करून राजपुतांच्या कुळास कलंक लावणं हें मला बरं वाटत नाहीं. माझें रक्षण करण्यासाठीं बादशहाबरोबर टक्कर देण्याचें सामर्थ माझ्या बापांच्या अंगांत नसल्यामुळें मीं राजसिंहाला निरोप पाठविला, पण माझ्या दुर्दैवामुळें राणेसाहेब केवळ पन्नास राजपुतांनिशीं आले आहेत, तरी पण, तेवढ्याच लोकांसमवेत त्यांची बहादुरी आपण पाहिली असेल !

मुबारक-( आश्चर्यानें ) ऐं ! तो क्या पचासही सवारोंने हमारे एक हजार मुगलोंको मार डाला ?

चंचल०-याचं कांहीं आश्चर्य वाटायाला नको.

असं पुष्कळदां घडलं आहे. पण, त्या होऊन गेलेल्या गोष्टींचं काय? सध्या राजसिंहाजवळ कुमक अगदीं नसल्यामुळें, त्यांचं बळ आपणासमोर कांहीं चालणार नाहीं, म्हणूनच मी आपणाकडे आलें आहे. मला घेऊन दिल्लीस चला. लढाईचं कांही काम नाहीं.

**मुबारक**—हां, ये कहिये, आप अपनी जान देकर राजपुतोंकी हिफाजत करना चाहती है, लेकिन ये तो बतलाईये कि वह भी इसमें राजी है?

**चंचल०**—हें कसं बरं होईल? ते लढल्याशिवाय रहाणार नाहींत. आपण मला जरी दिल्लीस नेलं, तरी त्यांचं लढणं असंच चालायचं. यांत त्यांचा अंत झाला तरी बेहत्तर. पण आपण त्यांच्यांवर कृपा कराल तर बरं होईल.

**मुबारक**—ये तो हो सकता है. लेकिन उन्हे सरकशीकी सजा भी जरूर मिलनी चाहिये, इससे कत्ल न करुंगा. सिर्फ कैद कर लूंगा.

**चंचल०**—काय! कैद! हें तर जन्मांतरींही होणं नाहीं. आपण त्यांना मारालं पाहिजे तर, पण कैद? कधीं होणं नाहीं.

मुबारक–यह तो मुझे भी यकिन है. लेकिन आपका इरादा दिल्ली चलनेके लिये मुस्तकिल् है ?

चंचल०–होय, चलायला कांहीं हरकत नाहीं. पण दिल्लीपर्यंत जीवंत पोंचेन कीं नाहीं याचा मात्र संशयच.

मुबारक–यह क्या ?

चंचल०–त्याचं कारण हेंच कीं, तुह्मी पुरुष लढतां लढतां मरण जाणतां आणि आह्मां अबलाजातीना लढणं जरी येत नसलं, तरी पण मरणं येतंच येतं !

मुबारक–तोबा तोबा ! अल्ला, अल्ला ! ऐसा न फर्माईये. हम लोगोंको बहोतसे दुश्मन हैं, इस वजहसे हमे मरना और मारना पडता है. लेकिन, खुदा ना करदा आपका दुश्मन कौन है ?

चंचल०–हें आपण विचारूं नये. माझी मीच वैरिण आहें !

मुबारक–यह मुमकिन है. लेकिन उस दुश्मनके पास हथियार कहांसे आयें.

चंचल०–काय ? विषाला आपण लहान सहान हत्यार समजतां ?

मुबारक-है वह कहां? असें ह्मणून तो राजकन्ये-
कडेस पाहूं लागला.

एखादा नीच बुद्धीचा मुसलमान असता, तर तो निदान आपल्या मनांत तरी ह्मणाला असता कीं, "बेशक्. आपल्या दृष्टींत विष आहे!" पण मिर्जा मुबारक असल्या क्षुद्र बुद्धीचा मुसलमान नव्हता. तो राजसिंहासारखाच खरा वीर असल्यामुळें ह्मणाला:—"मादरे मेहरबान, खुद्कुशीका कस्द क्यों फरमाती हैं? अगर आप दिल्ली चलना नहीं चाहती, तो मेरी मजाल भी नहीं है कि ले जाऊं! मेरा तो जिक्र ही क्या हैं, जहांपनाह ( बादशहा ) भी तशरिफ् लाते, तो आपके साथ सख्तीसे पेश न आते! बंदेकी तो जिक्रही क्या है! आप बखौफ रहिये. कोई आपकी मरजीके खिलाफ् दम् न मारेगा. लेकिन राजपूतोंनें चूंकि हजरत् सलामतकेसाथ बें अदबीका इरादा किया है, लिहाजा उन्हे मै नहीं मुआफ् कर सक्ता.

चंचल०-माफ करा ह्मणून कोण ह्मणतें? लढा खुशाल!

इतक्यांत महाराणा राजसिंहही आपल्या निवडक

लोकांसहित तेथें आले. त्याला पाहून चंचलकुमारी मुबारक अलीस पुन्हां ह्मणाली; " लढा, लढा, खुशाल लढा, पण आपण हें समजूं नये कीं, रजपुतांच्या मुली लढणंजाणत नसतील ! "

ही लज्जाहीन रजपूतबेटी ह्या मुसलमान सेनापतीशीं काय बोलत आहे, हें ऐकावें ह्मणून राजसिंह त्या दोघांच्या अगदीं जवळ जाऊन उभे राहिले, तें पाहून चंचलकुमारीनें आपला हात लांबवून राजसिंहास ह्मटलें; महाराज, कृपा करून आपल्या कंबरेची तरवार दासीला द्याल तर बरें होईल.

राजसिंह हंसून ह्मणाले, हं हं, समजलें ! आपण आतां दुर्गेचा अवतार धारण करणार वाटतें ! असें ह्मणून त्यांनीं तिला कमरेची तरवार दिली. चंचलकुमारी ती फिरवीत मुबारकाच्या समोर होऊन ह्मणाली, हं, आतां यावें आपण लढायाला. राजपुतान्यांतील पोरी कशा लढतात ह्याचा अनुभव घ्या. जोंपर्यंत बायकांचे मुडदे पडणार नाहींत, तोंवर तुमच्या बादशहाची तृप्ति होणार नाहीं ! हें ऐकून मुबारकअली तिच्या बोलण्यास प्रत्युत्तर न देतां थोडासा हंसला व राजसिंहाकडे वळून

ह्मणाला—" उदेपुरके बहादुरोंने औरतोंकी मददपर लढना अबसे इखतियार किया है ? तें ऐकून महाराणा राजसिंहाचे नेत्र आरक्त झाले व रागानें दांत ओठ खात ते ह्मणाले—" जेव्हांपासून दिल्लीच्या हरामखोर मोंगल बादशहांनीं अनाथ बायकांवर जुलूम चालविला आहे, तेव्हांपासून. " समजलांत, खांसाहेब! नंतर आपल्या लोकांकडेस वळून तो ह्मणाला—बंधूंनो, आह्मां राजपुतांना वाचाळता किंवा नसता बडेजावपणा आवडत नाहीं, ह्मणून माझ्या शूरांनों, वेळ लावण्यांत अर्थ नाहीं. "काली माताकी जय " ह्मणून पुढें व्हा, व ह्या लांडग्यांचीं शिरकमळें आर्यभूदेवीस अर्पण करा.

ह्यावेळेपर्यंत आपापल्या धन्यांच्या आज्ञेची वाट पहात तटस्थ उभे असलेल्या दोन्ही पक्षांच्या लोकांतून राजसिंहाकडील लोक त्याचें वरील भाषण ऐकून " जय काली " ह्मणून मोंगलांवर तुटून पडले. मोंगलही " अल्ला हो अकबर " या ध्वनी करीत त्यांचा सामना करण्यास धांवले. पण चंचलकुमारी हातांत तरवार घेऊन दोन्ही पक्षांच्या मध्यें येऊन उभी राहिली व उच्च स्वरानें ह्मणाली कीं, जोंपर्यंत दोन्ही पक्ष शांत होणार नाहींत.

तोंपर्यंत मी ह्या ठिकाणाहून हलणार सुद्धां नाहीं. तुह्मां दोहों पक्षांपैकीं कोणी मला पहिल्यानें मारून टाका, नंतर पाहिजे तर लढावयास आरंभ करा-

महाराज राजसिंहाला हें तिचें करणें आवडलें नाहीं, ह्मणून ते रागानें तिला ह्मणाले—अग, तूं हें काय आरंभिलें आहेस, रजपुतांच्या वंशास कलंकित करणार कीं काय,? चल, हो एकिकडे. नाहींतर लोक मला ह्मणतील कीं, राजसिंहानें स्त्रीच्या साह्यानें आपला जीव वांचविला!

चंचल०—छे छे महाराज, असें कोणी देखील ह्मणणार नाहीं. आपल्या अगोदर मी मेलें ह्मणजे मग आपण पाहिजे तर लढून मरा. सारा बखेडा माझ्यासाठीं आहे. ह्मणून प्रथम माझाच सोक्षमोक्ष झाला पाहिजे. असें ह्मणून ती तेथेंच उभी राहिली.

हें तिचें साहस पाहून मोंगलाच्या सेनापतीनें आपल्या लोकांस शस्त्रें बाजूस ठेवण्यास सांगितलें; व दोहोंपक्षाकडील लोकांस उद्देशून तो ह्मणाला, " बादशाहे मुगलका काम औरतसे लढना नहीं है, लिहाजा मैने इस हसिनके मुकाबिले पर शिकस्त कबूल की, लढाई

मौकुफ. लेकिन, मुझे यकिन है कि राना **राजसिंहके** साथ फिर कभी हार जितका फैसला करना पडेगा. मैं रानासाहबकू अर्ज करता हूं कि, अबकी दफअ लढाईमें औरतोंको न लावे. ”

वरील भाषण करणारा मुबारक घोड्यावर जवळच उभा होता, त्याकडे वळून **चंचलकुमारी** ह्मणाली–बादशहानें आपणाला माझ्या करितांच पाठविलं आहेना? मग त्याला काय उत्तर द्याल?

**मुबारक०**–आपका फर्माना दुरुस्त है, लेकिन मुझे उस्के ( ईश्वराच्या ) सामनेकी जबाबदिहीका जियादा ख्याल है, जो सब बादशाहोंका बादशाह है.

**चंचल०**–तेव्हांचें तेव्हां. सध्यां जगाकडे तर पहा.

**मुबारक०**–जी जनाब, दुनियामें मुबारकआलीको किसीका खौफ नही है. खुदा आपको खुश रक्खे. बंदा रुखसत् होता है बंदगी.

असें ह्मणून **मुबारक** आपल्या लोकांस मागें फिरावयास सांगणार इतक्यांत मागून हजारो बंदुकांचे बार होऊन शतशः मोंगल रणभूमीवर पडूं लागले. मुबार-

कास मोठें आश्चर्य वाटलें; आतां काय करावें हेंच त्यास सुचेना,

---

## भाग सतरावा.

### निर्मला व माणिकलाल.

मोंगलांचें प्रचंड लष्कर ज्यावेळीं रूपनगरास चंचलकुमारीला न्यावयास आलें होतें, त्यावेळीं त्या प्रचंड सेनासमूहाची सर्वप्रकारें व्यवस्था राखावयासाठीं तेथील राजानें ( विक्रमसिंहानें ) आपल्या राज्यांतील सर्व योद्धे बोलाविले होते. हे लोक राजाकडून वेतन घेऊन सुखपूर्वक आपापल्या घरीं रहात आणि ऐन प्रसंगीं राजाच्या आज्ञेप्रमाणें धांवून येत. ह्यावेळीं ह्या लोकांना बोलाविण्याचा विक्रमसिंहाचा हेतु वर सांगितल्याच आहे. पण त्याखेरीजहीं आणखी एक अंतस्थ हेतु होता, तो हा कीं, जर मोंगलाच्या सैन्यानें कांहीं गडबड केलीच, तर त्या लोकांचा समाचार ह्या लोकांकडून घ्यावयाचा. अशा उद्देशानें बोलविलेले लोक "

आतां मोंगल गेले, आह्मांला निरोप द्या " ह्मणून विक्रमसिंहाचा निरोप घ्यावयासाठीं रूपनगरच्या राजवाड्यांत जमले होते. इतक्यांत, मोगल-रूप-धारी माणिकलाल तेथें आला. हाताचा अंगठा तुटलेला, सर्वांग घामानें डवडवलेलें असा घाबरलेला ( वेषधारी ) मोंगल योद्धा पाहून सर्व राजपूत चकित झाले. माणिकलाल जवळ येतांच विक्रमसिंहानें त्याला विचारिलें—कशी काय खबर आहे?

माणिकलालनें मोठ्या आदबीनें सलाम करून उत्तर दिलें—" हुजूर बडा गजब हो गया. पांच हजार डाकुओनें डोला घेर लिया है. जनाब हुसेन अलीखां साहब जान हाथ पर लिये हुये लढनेमें मशगुल हैं. लेकिन् फौजे शाही दुश्मनोंके मुकाबिलेके लिये काफी नहीं है. लिहाजा आपकी खिदमतमें मुझे भेजा है. और कहा है कि मदत कीजिये."

विक्रमसिंह हें ऐकून चकितांतःकरणानें ह्मणाले—हें तरी बरेंच झालें कीं, आमचे लोक येथें तयारच आहेत! असें ह्मणून त्यानें त्या जमलेल्या लोकांना उद्देशून ह्मटलें, माझ्या शुरांनो, आपणाला ह्या वेळींच युद्धाला निघालें

पाहिजे. माणिलाल ह्मणाला—"हुजूर, बेअदबी मुआफ मुझे तो हुकम दीजिये कि इन साहबोंको साथ लेके चलूं. और महाराज फौजका बंदोबस्त करके तशरिफ लावें, तो बिहत्तर होगा. बाकी लोग करिब पांच हजार है अगर कुछ औरमी इधरके सिपाही न होंगे तो खुदाही हाफिज है."

भेल्या विक्रमसिंहाला हें माणिकलालचें बोलणें खरें वाटलें. व त्याप्रमाणें त्यानें त्या लोकांस माणिकलाल बरोबर जावयास सांगून आपणही मागून लवकरच येतों असें सांगितलें. माणिकलाल त्या हजार कडव्या रज-पुतांना घेऊन रणभूमीकडील मार्गास लागला. मार्गानें जात असतां माणिकलालास रस्त्याच्या बाजूस अस-लेल्या झाडाखालीं कोणी स्त्री आहेसें दिसलें. तिच्या एकंदर लक्षणांवरून ती फार थकलेली व कोणत्या तरी दुःखानें गांजलेली असावी, असें दिसत होतें. ह्या लोकांची चाहूल येतांच ती उठली व तेथून जाण्याचा तिनें निश्चय केला, पण तिच्यानें पुढें पाऊल टाकवेना. ही तिची दशा पाहून माणिकलालास फार वाईट वाटलें.

व तिळा साह्य करावें. ह्मणून तो घोड्यावरून खालीं उतरला आणे तिच्या जवळ जाऊन पहातो, ती प्रत्यक्ष लावण्यखाणीच त्याला भासली! ती कोण आणि येथें अशी कां पडली ह्मणून त्यानें तिला प्रश्न केला. तिनें त्याच्या प्रश्नाचें कांहींच उत्तर न देतां त्यालाच उलटा प्रश्न केला, कीं आपण येथें कोणाला शोधतां व आपण कोण?

**माणिक०**—मी राणा राजसिंहाचा एक चाकर आहे.

**तरुणी**—मी ही रुपनगरच्या राजकन्येची सखी आहे.

**माणिक०**—मग येथें अशी कां पडलीस?

**तरुणी**—राजकन्येला मोंगल लोक दिल्लीस नेत आहेत ना?

**माणिक०**—बरें मग?

**तरुणी**—मी तिच्याबरोबर जात होतें, पण तिनं मला बरोबर न्यावयाचं नाकारलं, ह्मणूनच मी पायीं पायींच तिच्याकडे जात आहे.

**माणिक०**—हं, ह्मणूनच थकून पडलीस, नाहीं बरें?

तरुणी—फार चालावं लागल्यामुळें अगदीं थकून गेलें! आतां पायसुद्धां उचलावयाची शक्ति नाहीं!

माणिक०—पण तेथें पडून काय करणार?

तरुणी—करणार काय आतां? मरणार.

माणिक—छिः, मरणार काय ह्मणून? राजकन्येकडे चल.

तरुणी—कशी चालणार? चालावयाची शक्ति असेल, तेव्हांना?

माणिक—घोड्यावर बैस.

तरुणी—( हंसून ) घोड्यावर छेः भलतंच,

माणिक—कां बरें! भय थोडेंच आहे?

तरुणी—भय नसलं ह्मणून? मी शिपाई कां आहें?

माणिक—नसलीस तरी आजपासून आहे असें समज.

तरुणी—पण घोड्यावर बसतां येईल तेव्हांना?

माणिक—अग, ह्याची चिंता कशाला? माझ्या घोड्यावर बैस, ह्मणजे झालें.

तरुणी—जसा कांहीं तुमचा घोडा कळसुत्रीच आहे कीं तो चालविल्याशिवाय चालावयाचा नाहीं!

माणिक०—मग ह्याची भीति नको. मी त्याला धरून घालीन.

ह्या वेळपावेतों ती तरुणी निर्भिड होऊन माणिक-लाल बरोबर चेष्टा करीत होती, पण अखेरचा जबाब ऐकून तिनें लाजेनें आपलें तोंड फिरविलें व भिवया चढवून त्याला झिटकारून ह्मणाली जा, जा, आपलं काम करा. मला ती राजकुमारी नको नि तुह्मी ही नकोत. मी आपलें ह्या झाडाखालीं पडलें राहीन.

हें तिचें भाषण ऐकून माणिकलालला वाटलें कीं, हें सोन्याचें पांखरू हातांतून निसटावयास पहात आहे! ह्मणून, पुन्हां एकदां तिला विचारिलें—तुझें लग्न झालें आहे कीं?

तरुणी माणिकलालचा भाव जाणून ह्मणाली—नाहीं.

माणिक०—बरें, पण तुह्मी जात?

तरुणी०—राजपूत.

माणिकलाल—राजपूत! मग मी तरी राजपूतच असून मलाही स्त्री नाहीं. घरीं एक लहान पोर आहे, तिच्या जोगवणीसाठीं तिला आई कशी मिळेल, ह्या

चिंतेंत मी फार दिवसांपासून आहे, तेव्हां तिची आई होत असलीस, तर बोल. कबूल असलं तर ह्या घोड्यावर बैस. यांत कोणी कांहीं ह्मणणार नाहीं.

तरुणी—पण या तुमच्या बोलण्यावर कसा भरंवसा ठेवावा? शपथ वाहून सांगाल तर खरं समजेन.

माणेक०—शपथ? जी ह्मणशील, ती.

तरुणी—खरोखरी माझ्याशीं लग्न कराल ह्याबद्दल तरवारीवर हात ठेवून शपथ घ्या.

माणिकलाल तरवारीवर हात ठेवून ह्मणाला कीं, आजच्या युद्धांतून जर वांचलों तर तुझ्याशीं विवाह जरूर करीन.

तरुणी—आतां कांहीं माझं ह्मणणं नाहीं. चला.

माणिकलाल हर्षित होऊन त्यानें तिला घोड्यावर बचवून दिलें व मोठ्या खबरदारीनें घोड्यास धरून चालला.

वाचकहो, ही तरुणी चंचलकुमारीची सखी निर्मला आहे, हें तुम्हीं जाणलेंच असेल. नाहीं बरें?

---

# भाग अठरावा.

## माणिकलालची युक्ति.

पूर्वी दोहों पक्षांचीं लढाई जेथें जुंपली होती, त्या जागेच्या जवळ **माणिकलाल** येतांच त्यानें निर्मळ कुमारीस घोड्यावरून उतरविलें व एका व्यवस्थित जागीं तिला बसवून सांगितलें कीं, मी परत येईपर्यंत तूं येथेंच रहा. नंतर घोड्यावर बसून जेथें **राजसिंह** व मुबारक होते, तेथें आला आणि मुबारकाचे मागें उभा राहून रूपनगराहून आणलेल्या राजपूत लोकांना ह्मणाला—"पहातां काय शूरांनो, हेच ते लुटारू. ह्यांना पक्की शिक्षा दिली पाहिजे." तेव्हां कित्येक राजपूत ह्मणाले, हे तर मुसलमान आहेत हो!

**माणिक०**—मग? मुसलमान असले ह्मणून? मुसलमान लुटारू नसतात कीं काय? मारा लुच्चांना पहातां काय?

हें ऐकतांच हजार रजपूतांच्या बंदुकांचा कडाका होऊन मोंगल जमिनीवर लोळूं लागले. मुबारक मागें वळून पहातो तों, हजारों स्वारांनीं आपणावर हल्ला केला आहे, असें त्याला आढळलें. बिचारा भीतीनें गांगरून गेला! बहुतेक मुसलमान जे अजून जीवंत होते, ते जिकडे वाट फुटेल, तिकडे पळूं लागले. **मुबारकानें** त्या लोकांना पुष्कळ धीर दिला, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. मुसलमान लोक पर्वतावर चढून पळूं लागले आणि रजपूत त्यांचा पिच्छा करूं लागले. हा सर्व प्रकार पाहून महाराज **राजसिंह** अत्यंत विस्मयांत पडले होते. तोंच **माणिकलाल** येऊन त्यानें त्यांला प्रणाम केला. **राजसिंहानें** विचारलें, माणिकलाल, ही काय गडबड आहे. हें तूं जाणतोस? मला तर मोठा चमत्कार वाटतो.

**माणिकलाल**हंसून म्हणाला—हें सारें आपल्या दासाचेंच कृत्य आहे! ज्या वेळीं आपण त्या अरुंद रस्त्याच्या पार निघून गेलां, त्या वेळीं सर्वस्वी नाश होतो, असें वाटल्यावरून आणखी एक लुच्चेगिरी

करावी लागली! असें ह्मणून झालेला सर्व पाढा त्यानें राजसिंहाजवळ वाचला.

माणिकलालची अचाट कुशलता पाहून राजसिंहानें त्याला आनंदानें आलिंगन दिलें व ह्मणाले; खरोखर, तूं मोठाच स्वामिभक्त आहेस. परमेश्वराच्या कृपेनें एकदां उदेपुरास पोंचलों, ह्मणजे तुझ्या ह्या निस्सिम स्वामीकार्यदक्षतेबद्दल माझ्यानें होईल तेवढी तुझी संभावना मी करीन; पण गड्या, तूं आमचा एक मनोरथ सिद्धीस जाऊं दिला नाहींस. नाहीं तर मोंगलांना "राजपूत कसे मरतात. हें दाखविलें असतें"

माणिकलाल—महाराज, तें दाखविण्यासाठीं आपले पुष्कळ सेवक तयार आहेत. प्रसंग मात्र आला पाहिजे. आतां राजधानी सोडून रानावनांतून फिरावयाचे कांहीं काम राहिलें नाहीं. राजकन्येला घेऊन उदेपुरास चला.

राजसिंह—पण अजून आपले पुष्कळ लोक त्या पहाडावर आहेत, त्यांना बोलावून सर्वजण एकदमच चलूं. तसेंच, ते ब्राह्मणबुवा कोठें आहेत, ह्याचाही शोध करा.

माणिकलाल–आपण चला, तोंवर मी त्यांना घेऊन येतों. राजसिंहास ती गोष्ट मानवली व ते चंचलकुमारीसह उदेपुरास जावयास निघाले.

---

## भाग एकुणिसावा.

### संगम.

राजसिंहाला उदेपुरास बिदा करून माणिकलाल पहाडावर येऊन पहातो, तों रूपनगरच्या राजपुतांनीं गाळण उडविल्यामुळें सारे मोंगल लोक भीतीनें पळत आहेत व कित्येक छिन्नविच्छिन्न होऊन पडले आहेत, असें त्याला दिसलें. तें पाहून माणिकलाल रूपनगराहून आगलेल्या राजपुतांना ह्मणाला, शत्रू पळून गेले, तेव्हां आतां उगीच परिश्रम कशास? तुह्मी सारेजण रूपनगरास जा. शत्रू सारे पळाले, हें ऐकून राजपूतांनींही ‘ बरें आहे ’ ह्मणून घराचा मार्ग धरिला. एका क्षणांत सारा पर्वतप्रदेश शून्य होऊन केवळ लढाईंत पडलेले मृत स्वार व घोडे ह्यांचीच रेलचेल जिकडे

तिकडे दिसूं लागली. हें पाहून राजसिंहाचे लोकही समजले कीं महाराज उदेपुरास निघून गेले. लगेंच त्यांनींही उदेपुराचा मार्ग धरिला आणि मार्गांतच त्यांची व राजसिंहाची गांठ पडून मिळून मिसळून सर्वांनीं उदेपुरास कूच केलें.

सर्व राजपूत व राजसिंह हे तर ह्यावेळीं एकेच ठिकाणीं होते, पण माणिकलाल मात्र अजून आला नव्हता. तो येणार कसा? सगळ्या राजपुतांला मार्गास लावून आपण निर्मलकुमारीकडे आला व त्यानें तिच्या भोजनाची तयारी करून दिली. भोजन झाल्यावर गांवांतून एक पालखी आणवून तींत निर्मलकुमारीला बसविलें आणि पुढें कांहीं व्यत्यय येऊं नये ह्मणून धोपट मार्ग सोडून आडमार्गानें पूर्वीं सांगितलेल्या चुलतीच्या घरीं आला. व तिला हांक मारून ह्मणाला--" काकू, काकू ही पहा, मीं तुला एक सून आणिली आहे! ह्मातारी बाहेर येऊन पहाते, तों खरेंच. निर्मलेला पाहून ह्मातारीला अमळ वाईट वाटलें व तिच्या मनांत आलें कीं, आतां घरची मालकीण आल्यावर मला थेरडीला कशाला

काहीं मिळेल? पण उघडरीतीनें कांहीं बोलतां येईना. तरी पूर्वी मिळालेल्या मोहरेमुळें आणखी लोभ सुटून ती ह्मणाली, मुलगी तर फार देखणी आहे बुवा!

**माणिक०**—पण अजून लग्न झालें नाहींना?

**ह्मातारी**—तर मग?

**माणिक०**—तर मग काय? आजच लग्न उरकलें पाहिजे!

**ह्मातारी०**—हें तर मीही ह्मणत्यें? पण खर्चायला?

**माणिक०**—त्याची चिंता नको.

असें ह्मणून रणभूमीतून फिरतेवेळेस मृत मोंगलाच्या सांपडलेल्या धनापैकीं कांहीं **मोहरा** ह्मातारीच्या स्वाधीन केल्या. ह्मातारीनें लगेंच पुरोहितबुवाला आणून शास्त्रोक्त रीतीनें **निर्मलेला माणिकलाल**ची अर्धांगी केली.

ह्या नंतर निर्मलकुमारीसह **माणिकलाल** उदेपुरास आला आणि **राजसिंहाच्या** दरबारांत मोठ्या प्रतिष्ठेनें राहूं लागला. निर्मलाही चंचलकुमारीच्या भेटीनें आनंदीत झाली. **चंचलकुमारी** आणि **राजसिंह** यांचा विवाह मोठ्या समारंभानें होऊन, तीं उभयतां आनंदानें

राज्य करूं लागली. माणिकलालचा आणि मागें सांगि- तलेल्या त्यांच्या लांबच्या नातेवाईक काकूचा विशेष संबंध राहिला नाहीं. त्याची मुलगी निर्मलेच्या उत्संगीं खेळूं लागली. शिशुपालासारखी दशा झालेली पाहून औरंगजेबानें राजसिंहाबरोबर देबीर नांवाच्या क्षेत्रांत पुनः भयंकर युद्ध केलें, पण तेथेंही तो हरला. त्या गोष्टीशीं आणि आमच्या प्रस्तुतच्या कथानकाशीं कांहीं संबंध नसल्यामुळें ती हकीकत येथें दिली नाहीं.



# अलभ्य लाभ.

अनेक गद्यपद्य विषयांनीं युक्त अशा २४ पृष्ठांच्या लोकमित्र मासिक पुस्तकास यंदा ह्मणजे १९०१ सालीं व्ही. पी. खर्चासह १॥ देऊन वर्गणीदार होणारास तीन रुपयांचीं पुस्तकें फुकट पाठविणार आहों. त्यांत वंगग्रंथाधारें मराठींत लिहिलेली राजसिंह ही एकोणीस भागांची कादंबरी, प्रसिद्ध लेखकानें अनेक आधारांवरून लिहिलेलें जगन्नाथराय पंडित यांचें विस्तृत चरित्र, अहमदनगरची रणपटु सुलताना चांदबिबी हीं तीन व दुसरीं कित्येक पुस्तकें मिळणार आहेत. अशिलाच संतोष तोच महत् लाभ जाणून थोडे दिवस ही लूट केली आहे. एप्रिल १९०१ त १॥८ आणि दुप्पट जाणार आहे. मा. पु. वर्षारंभ जुलै पासून आहे.

पत्ता:—लोकमित्रकर्ते—खानापूर—बेळगांव.